# अग्रपूजा
## व
## इतर गोष्टी

लेखक
केशव गणेश अलूरकर, एम्. ए., एस्. टी. सी.

प्रस्तावना लेखक
वसंत रामचंद्र नेरूरकर, एम्. ए., एस्. टी. सी.,
टी. डी. (लंडन), एम्. आर्. एस्. टी. (इंग्लंड).

प्रकाशक
केमकर आणि मंडळी,
पब्लिशर्स, बुकसेलर्स व स्टेशनर्स
विठ्ठलभाई पटेल रोड, मुंबई नं. ४



आवृत्ति पहिली ] [ सन १९४४

किंमत १ रुपया

# प्रस्तावना

शाळा म्हणजे कोंडवाडा नव्हे. तर घराप्रमाणेंच जेथें आपल्याला खेळतां बागडतां येतें असें रम्य स्थान. शिक्षक हा राखण करणारा गुराखी किंवा मेंढपाळ नसून आपणाशीं खेळीमेळीनें वागणारा मित्र. मुलांचें मन म्हणजे कोरी स्लेट नसून सर्वतोपरी परिपूर्ण असणारी उन्मीलनोन्मुख कलिका व तिच्या विकसनाला हळुवार-पणें ओंजारून गोंजारून योग्य मार्ग दाखवून मदत करणे हेंच शिक्षकाचें काम. ह्या व अशा प्रकारच्या आधुनिक शिक्षणतंत्राबद्दलच्या सत्य कल्पना आतांशा कुठें आमच्या हळु हळु गळीं उतरत आहेत! एकाद्या वर्गावरून चालले असतां वर्गांत मुलें आनंदानें व हंसतखेळत अभ्यास करीत असून वर्गशिक्षक मुलांमध्यें बसून त्यांना प्रोत्साहन देत असतां वर्गांत होत असलेला बालकांचा गोड किलकिलाट आपल्या कानावर येत आहे, असें रम्य दृश्य हल्लीं हल्लीं कुठें प्राथमिक शाळांमध्यें दृष्टीस पडूं लागलें आहे. अशा रीतीनें Playway Spiritनें चालविलेल्या शिक्षणक्रमांत कहाण्या, गोष्टी, बालगीतें ह्यांना केव्हांहि प्रमुख स्थान मिळणार हें निराळें सांगण्याची आवश्यकता नाहीं. लहानमुलांच्या शिक्षणास येथूनच आरंभ होतो. म्हणूनच आपल्या भाषेबद्दल प्रेम व आवड उत्पन्न करण्याच्या बाबतींत बालवाङ्मयाची फार जरूरी आहे. अशा प्रकारच्या प्रयत्नांस गेल्या १०।१२ वर्षांत निघालेल्या निरनिराळ्या वाचनमालांपासून सुरवात होऊन आतां बालवाङ्मयाची निर्मिति थोड्याबहुत प्रमाणांत जोरानें होत आहे ही समाधानाची गोष्ट आहे. "आनंद", "खेळगडी" सारख्या उत्कृष्ट दर्जाच्या मासिकांनींहि ह्या बाबतींत बरीच मोठी कामगिरी केलेली आहे.

माझे व्यवसायमित्र श्रीयुत केशवराव अलूरकर यांनीं प्रस्तुत कथागुच्छ "अग्रपूजा व इतर गोष्टी" गुंफून आपल्या 'हृद्गतांत' लिहिल्याप्रमाणें बालवाङ्मयांत यशस्वी रीतीनें भर घातलेली आहे असें म्हणण्यांत कोणत्याच प्रकारें अतिशयोक्ति नाहीं असें मला खात्रीनें वाटतें. ह्या गोष्टी चिऊकाऊंच्या गोष्टींच्याहि सदरांत घालता येणार नाहींत, तसेंच लघुकथेच्या तंत्राकडे तेवढीशी नजर ठेवून लिहिल्या नसल्या-मुळें आधुनिक लघुकथासंग्रहामध्यें त्यांना स्थान नाहीं. तरी पण मनरंजनाला

अप्रत्यक्षरीत्या बोधाची जोड दिल्यामुळें-बोध असलाच पाहिजे असा आग्रह मुळींच नाहीं-मुलें मोठ्या आवडीनें त्या वाचतील व वाचनापासून इष्ट तो परिणाम त्यांच्या मनावर खात्रीनें होईल असा मला भरंवसा वाटतो. चिमुकल्या गणपतीच्या चिमुकल्या डोक्यांतून निघालेली शक्कल वाचतांच बालवाचक आनंदानें टाळ्या पिटतील तर सृष्टिवेड्या मोहनाप्रमाणें आपणांला एक दिवस तरी Waterbaby चा अनुभव घेतां येईल तर किति किति मौज होईल असें त्यांना वाटूं लागेल. शेवटच्या तीन कथा खरोखरच सरस आहेत. त्यांमध्ये प्रत्येकींत गोवलेलें मधून मधून डोकावणारे सत्तत्व त्याहिपेक्षां सुंदर आहे. 'संमेलनाचें सर्वोत्तम बक्षीस' ह्या सर्वोत्तम गोष्टींतील ठिकठिकाणीं दिसून येणारे त्यागवृत्ति व कर्तव्यजागृति हे दोन गुण ह्या बालवयांत बालवाचक आपल्या आंगीं बाणण्याचे प्रयत्न करतील तर कालान्तरानें उत्कृष्ट नागरिक होण्याची पात्रता त्यांच्या आंगीं येईल ह्यांत बिलकुल संशय नाहीं. 'विमल'सारखें बक्षीस मिळविण्याचा प्रयत्न प्रत्येकानें करावा.

प्रस्तुत कथासंग्रह लिहून श्रीयुत अल्रकर ह्यांनीं बालवाङ्मयक्षेत्रांत पदार्पण केलेलें आहे. बालवाचक ह्या त्यांच्या प्रयत्नाचें कौतुकाने स्वागत करतील अशी मला आशा आहे.

श्री. अल्रकर यांनीं आपुलकीच्या भावनेनें प्रस्तावना लिहिण्याबद्दल केलेली सुचना मीं स्वीकारली. वेड्यावांकड्या दोन शब्दांत लिहिलेली ही प्रस्तावना त्यांच्या कार्याला जरी का थोडीबहुत उपकारक झाली तरी मला आनंदच होईल.

गिरगांव, मुंबई. **वसंत रामचंद्र नेरूरकर.**

---

# लेखकाचें हृद्गत.

मुलांना खाऊ तर अतिशय प्रिय असतोच, परंतु त्यापेक्षांहि क्वचित् त्यांना गोष्टी जास्त आवडतात असा माझा अनुभव आहे. आणि तसें पाहूं जातां मोठ्यांना तरी शुष्क तात्त्विक किंवा शास्त्रीय प्रबंध निबंधांहून कथा कादंबऱ्या प्राय: अधिक रुचत नाहींत का? ललित व शास्त्र यांतून ललितांत बहुजनसमाजाच्या मनाची पकड घेण्याचें सामर्थ्य नि:संशय अधिक आहे हें सत्य नाटकें, चित्रपट, संगीत वगैरे-वरील लोकांच्या वाढत्या आसक्तीवरून नित्य प्रत्ययास येतें. संत ज्ञानेश्वरांचें किंवा तुकारामबोवांचें चरित्र सहसा न वाचणारी व्यक्ति तें रंगभूमीवर वा रुपेरी पडद्यावर आलें असतां मोठ्या गोडीनें पहाते, इतकेंच नव्हे, तर एखाद्या सांप्रदायिकाच्या भाविकतेनें त्याचीं अनेक पारायणें करण्यास देखील आळस करीत नाहीं. सारांश, मुलांना काय किंवा मोठ्यांना काय, एकच मानसशास्त्र लागू पडतें आणि त्यांची ही बौद्धिक बुभुक्षा शमविण्यासाठीं वरील प्रकारचें ललित खाद्य पुरविण्याचें काम साहि-त्यिक, चित्रकार, गायक वगैरे कलाभिज्ञ नेहमीं करीत असतात. परंतु मुलांचे बाब-तींत मात्र आपल्या या कंगाल देशांत—आणि विशेषेंकरून आपल्या महाराष्ट्रांत—ह्या ललित वाङ्मयीनं खाद्याचें दुर्भिक्ष इतर बालोपयोगी पौष्टिक व सकस खाद्यां-प्रमाणेंच फार तीव्रतेनें जाणवतें. यास कारणें कांहींहि असोत. त्यांची मीमांसा करीत बसण्याचें हें स्थळ नव्हे.

शिक्षणक्षेत्रांत अलीकडे शिशुवर्गाकडे जास्तींत जास्त अवधान पुरविण्याची क्रान्ति धिमे धिमे का होईना घडून येत आहे व कित्येक शालामंदिरांत बालवर्गाला ( उदा. मॅांटेसरी वर्ग ) मॅट्रिकसारख्या वरच्या इयत्तांइतकेंच प्राधान्य देण्यांत येतें आणि तें योग्यहि आहे. तथापि बालकांत नव्यानेंच उत्पन्न केली गेलेली व वाढत्या वयानुसार वाढत जाणारी वाचनाची जिज्ञासा तृप्त करण्याकरितां मात्र योग्य प्रकारची व पुरेशा प्रमाणांत बाल-साहित्याची निर्मिति निदान आज तरी दृष्टीस पडत नाहीं हें स्वत: नाणावलेले साहित्यिकच मान्य करतात. [ पहा, वाङ्मय -परिचय, मुंबई ( व उपनगर ) मराठी साहित्य-संमेलन, अधिवेशन ७ वें-१९४३ पृष्ठ ५८, समीक्षिका मिस् सुलभा पाणंदीकर ] दूर कशाला, ही गोष्ट कोणत्याहि वाचनालयास, किंबहुना,

पुस्तक विक्रेत्याच्या दुकानी सुद्धां या दृष्टीनें भेट दिल्यास कोणालाहि सहज पटेल. तेथें मुलांकरतां-आणि विशेषंकरून विशिष्ट वयांच्या मुलांकरतां graded म्हणजे पायरी पायरीनें वाचतां येण्यासारखें असें वाङ्मय अगदींच तुटपुंजें असलेलें दिसेल. मुलांकरतां चालविण्यांत येणाऱ्या मासिकाविषयींहि सामान्यत: हेंच म्हणतां येईल. तीं संख्येनें अत्यल्प असून बाह्यांग व सजावट यांत तितकीशी आकर्षक नसतात. असो. बालवाङ्मयाकडे आमच्या साहित्यिक विद्वानांचें व शिक्षणतज्ज्ञांचें, आणि त्यांहीपेक्षां आमच्या प्रकाशकनसंस्थांचे जेव्हां सांप्रतच्यापेक्षां अधिक लक्ष जाईल तो सुदिन !

प्रस्तुतच्या प्रयत्नामागे, उपरिनिर्दिष्ट बालसाहित्यांत आपल्याकडून अत्यंत अल्पशी भर घालतां आली तर पहावे एवढाच हेतु असून तो श्री. केमकर आणि मंडळींच्या प्रोत्साहनानें मूर्त स्वरूपास आला याबद्दल त्या मंडळीचे आभार मानले पाहिजेत. प्रस्तुत कथासंग्रह मी सुमारें दोन वर्षांपूर्वी येथील दुसऱ्या एका होतकरू प्रकाशकांकरितां त्यांच्याच आग्रहाचे विनंतीवरून लिहिला होता. परंतु कागद वगैरे मुद्रणसाहित्याच्या अनपेक्षित महर्घतेमुळे त्या प्रकाशकांना माझें हे चोपडे उजेडांत आणणे अशक्य झाले ! आणि मीहि सदर चोपडें माझ्या भिडस्त व प्रसिद्धिपराङ्मुख स्वभावधर्मामुळे तसेच अंधारांत धूळ खात पडूं दिलें; आणि जर श्री. पु. दा. कुलकर्णी ऊर्फ केमकर मास्तरांचे सुविद्य व उत्साही चिरंजीव व माझे एके काळचे विद्यार्थी श्री.माधवराव कुलकर्णी ऊर्फ केमकर B.A. यांनी तें मजकडून मुद्दाम मागून घेऊन तात्काळ प्रकाशांत आणण्याचे ठरविलें नसतें तर मला वाटतें तें आणखी किती काळपर्यंत अंधारांतच पडून राहिलें असतें देव जाणे !

चालू कागद वगैरेच्या भयानक महर्घतेच्या परिस्थितींतसुध्दां केमकर-मंडळींनी आपुलकीच्या भावनेनें माझ्या या छोटेखानी पुस्तकास प्रकाशलाभ होऊं दिला व शक्य ती सुंदर सजावट त्याला लाभूं दिली हें साहस त्यांच्यासारख्या नवोदित प्रकाशनसंस्थेला भूषणावह नाहीं का ? या साहसाचें सकौतुक अभिनंदन करून त्यांस योग्य तें उत्तेजन देणें हें सहृदय व अभिज्ञ जनतेचें काम आहे, व तें ती केल्यावांचून राहाणार नाहीं अशी प्रस्तुत लेखकास पूर्ण आशा-नव्हे-खात्री आहे.

प्रस्तुत गोष्टी फक्त एकच खेरीजकरून अगदीं स्वतंत्र आहेत; 'शाबास ! रघुपति, शाबास ! ! ' हीच एक गोष्ट एका छानदार इंग्रजी गोष्टींतल्या मध्यवर्ती

कल्पनेवर आधारली आहे; मात्र साजसजावट वगैरे सर्व माझी आहे. प्रस्तुत कथा कलात्मक व तंत्रबद्ध रचण्याचा मीं अल्पसा प्रयत्न केला आहे आणि बालकथा-वाङ्मयांत तो अगदींच अपूर्व असा नसला तरी दुर्मीळ खास आहे असें माझ्या अल्प बुध्दीस वाटतें. हें 'प्रयोग-विज्ञान' विद्वानांचा परितोष मिळेपर्यंत नीट साधलें आहे असें मानणें हास्यास्पद होईल. रसिक, बालरंजनाभिज्ञ, मार्मिक व व सहृदय समीक्षकांकडून आणि त्याचप्रमाणें वाचकांकडून मिळणाऱ्या लवमात्रहि उत्तेजनानें लेखकास उत्तरोत्तर अधिक चांगली निर्मीति करावयास प्रोत्साहन मिळू शकेल हें सांगावयास नकोच.

अल्प परिचय असतांहि माझ्या विनंतीस मान देऊन येथील एक प्रसिद्ध शिक्षण-तज्ज्ञ व बाल-साहित्य-विशारद प्रिन्सिपाल् व्ही. आर्. नेरूरकर, M. A., S. T. C., T. D. (London), M. R. S. T. (England), यांनीं माझ्या या पुस्तिकेस आपली विद्वत्ताप्रचुर आणि सुंदर अशी छोटीशी प्रस्तावना लिहून दिल्या-बद्दल त्यांचा मी अत्यंत आभारी आहें.

पुस्तकांत अपरिहार्य कारणांमुळें अनेक मुद्रणदोष राहून गेले याबद्दल सहृदय वाचक मला सहानुभूतीनें क्षमा करतील अशी अशा आहे.

शेवटीं, ज्या माझ्या अनेक विद्वान् व साहित्यिक मित्रांनीं पुस्तकप्रकाशनाचे बाबतींत मला अनेक प्रकारचें सहाय्य केलें त्याबद्दल त्यांच्या नांवांच्या अनुल्लेखनानेंच मला त्यांचे आभार मानणें भाग आहे.

जर कदाचित् शालाधिकाऱ्यांकडून या 'अग्रपूजेचा' चांगला स्वीकार झाला व आपल्या शाळांत इ. १, २ वा ३ पर्यंत (दुय्यम) व इ. ५, ६ किंवा ७ पर्यंत (प्राथमिक) हें पुस्तक पुरवणी किंवा स्थूलवाचनासाठीं त्यांचेकडून नेमण्यांत आलें तर त्यांतील दरेक गोष्टीवर विद्यार्थ्यांच्या दृष्टीनें अभ्यासास उपयोगी अशी मजपाशीं लिहून तयार असलेली 'मर्मग्राही व विवेचनात्मक निवडक टिपणें व प्रश्न' स्वतंत्र पुस्तिकेच्या रूपानें प्रकाशित करण्याचा हेतु आहे तो सिद्धीस नेण्यास—

'सत्य संकल्पांचा दाता भगवान्' समर्थ आहे.

सीताभुवन, अक्षीकर स्ट्रीट,
दादर, मुंबई.

के. ग. अलूरकर.

———



चि. अनसूया अर्थात् लाडक्या नंदास—

तुलाच पहिल्यांदां सांगितलेल्या यागोष्टी छापून आलेल्या पाहाण्याची तुला कोण घाई ! या आल्या पहा छापून एकदांच्या. झालं आता समाधान ? चित्रं सुंदर आहेत ना ? तुझ्यामुळें स्फुरलेल्या म्हणून मी या कथा तुलाच अर्पण करतों. पुस्तक नीट जपून वापर आणि तुझं वाचून झालं म्हणजे तुझ्या बालमित्रांना तें वाचायला देशीलच. कारण, मला ठाऊक आहे कीं तसें करण्यांत तुला भारी आनंद नी अभिमान वाटतो.

तुझे

'काका

# अनुक्रमणिका.

# १. अग्रपूजा

मुलांनो, मला खात्रीपूर्वक असें वाटतें कीं, तुम्हांला जर कोणीं विचारलें कीं, "काय रे, तुम्हांला सर्वांत कोणता उत्सव जास्त आवडतो?" तर तुम्ही उत्तर द्याल, "आम्हांला गणेशोत्सव सर्वांत जास्त आवडतो." बरें तर, अशा या मुलांना भारी आवडणाऱ्या देवाची एक मजेदार गोष्ट मी तुम्हांला सांगणार आहें.

एकदां काय गंमत झाली, वैकुंठांत कसला तरी मोठा उत्सव होता व त्याकरतां श्रीविष्णूंनीं सर्व देवांना बोलावलें होतें. उत्सव मोठ्या थाटानें पार पडला. देवाच्या घरीं काय कमी? ज्याला जीं आवडतील तीं पक्वान्नें खावयास पुरविलीं होतीं. आमच्या गजाननमहाराजांनीं मोदकांवर मारे चांगलाच हात मारला होता. अन् त्यांचें आधींच डेऱ्यासारखें असलेलें पोट खूपच मोठें झालें होतें. जो तो गणपतीच्या पोटाकडे पाहून हंसूं लागला. गणपतीलाही अर्थात् राग आला. त्यांतल्या त्यांत इंद्र त्याची उघड उघड चेष्टा करून सारखा फिदी फिदी हंसत होता. अन् चंद्र त्याला साथ करीत होता. गणपतीला हें सहन झालें नाहीं.

गणपति म्हणाला, "काय हो, तुम्ही एवढे मोठे अन् माझ्या-सारख्या लहान मुलाची टिंगल करतां तेव्हां तुम्हांला काय म्हणावं? तुम्हांला वाटत असेल, याचं एवढं मोठं पोट, या जडजंबालाच्या हातून

काय होणार? पण तुम्हांला मी सांगून ठेवतों कीं तुम्हां सर्वांहून मी कोणतीही गोष्ट अधिक त्वरेनें करून दाखवीन."

गणपतीची ही हिरीरीची भाषा ऐकून पुन्हां हशा पिकला. गणपति चिडला व विष्णूंना म्हणाला, " विष्णो, तुम्हीच या गोष्टीचा आतां निकाल लावा." त्यावर विष्णु म्हणाले, " हें पहा देव हो, आपण आतां असें करूं. गणपतीनें सर्व देवांना एक प्रकारें आह्वानच दिलें आहे. तेव्हां आतां आपल्या आजच्या उत्सवाचा शेवट आयताच मौजेचा होणार आहे! आपण एक गंमतीची चढाओढ ठेवूं. ज्यानें त्यानें आपल्या वहानावर बसून किंवा पायींच धांवून आपल्या स्वर्ग-लोकाभोंवती प्रदक्षिणा घालायची. ज्याची प्रदक्षिणा सर्वांच्या आधीं संपेल त्याला एक छानदार बक्षीस मिळेल." गणपतीनें उत्सुकतेनें विचारलें, " काय बक्षीस घाल, बोला?"

विष्णु म्हणाले, " या चढाओढींत पहिला येणारा जें मागेल तें."

" काय हो, कबूल आहे हें सर्वांना?" गणपतीनें प्रश्न केला.

" हो, हो, कबूल, त्रिवार कबूल." सर्वजण ओरडून म्हणाले. व इंद्रानें हंसत हंसत चंद्राच्या हातावर जोरानें टाळी लगावली व ते दोघेही गणपतीच्या पोटाकडे अन् सोंडेकडे आळीपाळीनें डोळे मिचकावीत पाहूं लागले. पुन्हां एकदां हशाला भरती आली. पण गणपति मात्र अगदीं स्वस्थ होता. एक चकार शब्द बोलला नाहीं. पण त्याची मुद्रा मात्र गंभीर झाली होती. त्याच्या बारीक डोळ्यांत एक विलक्षण झांक मारीत होती. आणि कसला तरी जबरदस्त गूढ विचार त्याच्या त्या भव्य डोक्यांत त्या क्षणींच चालू होता असें सूक्ष्म पहाणाऱ्याला दिसलें असतें. असो.

देवांच्या या अपूर्व शर्यतीची सर्व जय्यत तयारी झाली. विष्णूंनीं सर्व देवांना एका रांगेंत उभे केलें. इंद्र आपल्या ऐरावतावर, ब्रह्मदेव आपल्या हंसावर, शंकर नंदीवर, यमराज महिषावर, अग्नि मेषावर, चंद्र हरणावर, सूर्य आपल्या सात घोड्यांच्या रथांत, असे बहुतेक सर्व देव आपआपल्या वाहनांवर आरूढ होऊन शर्यतीसाठीं सज्ज होऊन उभे होते. विष्णूंनीं शंख फुंकतांच सर्वांनीं धांवायला सुरवात करायची. गणपति आपल्या उंदरावर बसून जेव्हां देवांच्या रांगेंत येऊन उभा राहिला, तेव्हां फिरून एकदां हशा पिकला. पण यावेळीं गणपति मुळींच न रागावतां त्या हशांत जोरानें सामील झालेला पाहून इंद्रचंद्रांचा हशा बराच थंडावला.

ठरल्या वेळीं शंख जोरानें वाजला आणि ही स्वर्गींची अपूर्व शर्यत सुटली. हा सोहळा पाहाण्याकरतां यक्ष, गंधर्व, विद्याधर, सिद्ध, किन्नर वगैरे प्रेक्षकांच्या विमानांची आकाशांत एकच दाटी झाली!

पहिल्या पहिल्यांदा ऐरावतानें सर्वांना मागें टाकलें, परंतु थोड्या वेळानें हंस इतक्या वेगानें उडूं लागला कीं, ऐरावतच काय पण बाकीचीं सगळीं वाहनें कोठच्या कोठें मागें राहिलीं. आमचे गणपति-बाप्पा तर निघाल्या ठिकाणापासून फार फार तर शंभर एक कदम गेले असतील नसतील. बिचारा उंदीर धांवण्याची पराकाष्ठा करीत होता. पण तो इवलासा जीव पाठीवर एवढें मोठें धूड घेऊन धांवून धांवून किती धांवणार? लौकरच बिचारा थकला आणि त्याची गति अर्थात् पुष्कळच मंदावली! तितक्यांत बाप्पा त्याच्या कानांत कायसें पुटपुटले म्हणून बरें, नाहींतर उंदीरमामांची कांहीं धडगत नव्हती हें निःसंशय बिचारा रस्त्यांतच कंबरडें मोडून कोसळून पडला असता!

आपल्या मालकाची ती गुप्त आज्ञा होतांच उंदराच्या जिवांत जीव आला व गेलेलें अवसान परत आणून त्यानें एकदम 'राइट अबाउट् टर्न' म्हणजे तोंड एकदम उलट दिशेला करून निघाल्या ठिकाणाकडे तुरु तुरु धांवण्यास सुरवात केली. आणि थोड्याच वेळांत गणपतीला तेथें सुखरूप आणून पोंचविलें.

शर्यतीची मौज पाहण्याकरतां देवस्त्रियांचा तांडा त्या ठिकाणीं उभा होता. आणि गणपतीला तसाच परत आलेला पाहून सावित्री ओरडली, "वा रे ध्याना! आलास का परत? मग शर्यतीला उभा राहण्याचें सोंग तरी कशाला केलेंस?"

"अग, त्याची मोदकांची शिदोरी तो विसरला असेल, ती घ्यायला तो परत आला आहे नी दुसरें काय?" लक्ष्मी त्याला खिज-विण्याच्या उद्देशानें म्हणाली.

"छे ग, मी खात्रीनें सांगतें कीं, उंदीरमामांना वाटेंत एकादं मांजर आडवं गेलं असेल!" शची मध्येंच ओरडून म्हणाली. त्यावर सर्वजणी खूप हंसल्या. अशा रीतीनें कोणीं कांहीं कोणीं कांहीं बोलून गणपतीची जी ती देवस्त्री थट्टा करूं लागली. पार्वतीला अर्थात् आपल्या मुलाची चाललेली थट्टा आवडली नाहीं. त्या माउलीचा आपल्या मुलाच्या कर्तृत्वावर पूर्ण विश्वास होता. ती म्हणाली, "बाळ, परत कां आलास? अरे, मी जिंकीन अशी प्रतिज्ञा ना केली होतीस सर्वांच्या देखत? निदान, बाळा, परत तरी यायचं नाहीं मधनंच. सारी प्रदक्षिणा पुरी केली असतीस तर असा थट्टेचा प्रसंग येता ना!"

गणपति म्हणाला, "आई, या बायांच्या थट्टेकडे तूं मुळींच

लक्ष देऊं नकोस. ही शर्यत मी जिंकून दाखविणार या बद्दल शंका नको. तूं अगदीं निर्धास्त ऐस आणि स्वस्थ बसून पाहा काय काय गंमत होते ती."

आपल्या लाडक्या पण कर्तृत्ववान् मुलाच्या आश्वासनानें कोणत्या मातेचा जीव समाधान पावणार नाहीं ? तसा गणपतीच्या बोलण्यानें पार्वतीचा जीव भांड्यांत पडला आणि लक्ष्मी, सावित्री, शची इत्यादि स्त्रियांच्या हंसण्याकडे तिनें पूर्ण दुर्लक्ष करण्याचा निश्चय केला. एवढें होतांच गणपतीनें मुकाट्यानें उठून आपल्या आई भोंवतीं तीन प्रदक्षिणा घातल्या. आणि शर्यत निघाली होती त्या ठिकाणापासून जवळच एका झाडाच्या शीतल छायेखालीं जेठा मारून स्वस्थ बसून राहिला. थोड्याच वेळांत, खाल्लेल्या मोदकांच्या जाड्या-मुळें सुस्ती येऊन गणपति बाप्पा आडवे झाले व लौकरच त्यांच्या सोंडेंतून घोरण्याचा घुर्ररऽऽ घुर्ररऽऽ असा भला मोठा आवाज होऊं लागला.


गणपतीनें आईभोंवतीं तीन प्रदक्षिणा केल्या.



अशारीतीनें शर्यतीचा रागरंग क्षणोक्षणीं सारखा पालटत होता !

इकडे बाकीच्या देवांची शर्यत चालूच होती. क्षणांत हंस, तर क्षणांत गरुड, क्षणांत ऐरावत तर क्षणांत सूर्याचा रथ अशा रीतीनें शर्यतीचा रागरंग सारखा पालटत होता. परंतु प्रदक्षिणेच्या अगदीं शेवटच्या अवस्थेत बहुतेक वाहनें दमण्यानें किंचित् मागें मागें रेंगाळूं लागलीसें स्पष्ट दिसूं लागलें. गरुड व हंस आणि त्या दोघांच्या खालोखाल नंदी हीं त्रयी मात्र अगदीं समतोल वेगानें धांवत होती. त्यांच्यांतील एकाचीही ठिकाणीं किंचित्‌ही दमल्याचें चिन्ह दिसत नव्हतें. ते तिघे एकसारखे पुढपुढेंच धांवत होते, आणि थोड्याच वेळांत ते फज्ज्याच्या अगदीं पंचक्रोशींत येऊन ठेपले. बाकीचे उमेदवार यावेळीं इतके मागें पडले होते कीं, त्यांनीं किती जरी चपळाई केली तरी या तिघांपैकीं कोणातरी एकालाच विजयश्री माळ घालणार याविषयीं त्यांची खात्री होऊन चुकली.

झालें. शेवटीं शेवटीं गरुडानें अचानक आपला वेग वाढवला. विष्णूंनीं त्याला काय कानमंत्र दिला कोणास ठाऊक! पण त्यानें अशी एक जोराची झेप घेतली कीं, त्यासरशीं हंस काय किंवा नंदी काय ती पाहून क्षणभर जागच्याजागीं स्तंभितच झाले! निमिषार्धांत गरुडानें फज्जा गांठला, तेव्हां हंस नंदीची जोडी चांगली दोन तीन कोस मागें होती!

शर्यत संपली. कांहीं वेळानें सर्व देव निघाल्या ठिकाणीं परत आले. विष्णूंनीं शर्यत जिंकल्याचें सर्वांनीं मान्य केलें. पण शर्यतीची मूळ कल्पना ज्याच्या आव्हानावरून निघाली तो गणपति देवांच्यामध्यें कोठेंच दिसेना म्हणून विष्णूंनीं विचारलें, "अरे, पण सगळंच मुसळ केरांत. आपला मोरया नाहीं कोठें दिसत तो!"

"तो ना ? अहो, त्याला येथें परत येऊन पोंचायला लागतील एकदोन युगं." इंद्रानें टोमणा मारला.

"नाहींतर बसला असेल वाटेंत मोदकांचं गाठोडं सोडून मोदक खात." चंद्रानें इंद्राच्या विनोदास दुजोरा दिला.

"मला वाटतं, त्यांच्या उंदीरमामांचं मध्येंच कांहीं बरं वाईट तर झालं नाहींना वाटेंत ह्या राजेश्रींचें धूड पाठीवरनं वाहतां वाहतां?" वरुणानें शंका उपस्थित केली.

"राहूं दे ही थट्टा. आतां आपण शर्यतीचा रीतसर निकाल जाहीर करून बक्षीससमारंभाच्या कार्यास लागूं या. बराच उशीर झाला नाहीं का ?" ब्रह्मदेव म्हणाले.

"ठीक आहे. मी सर्व देवांच्या वतीनें असें जाहीर करतों कीं, ही स्वर्ग–प्रदक्षिणेची शर्यत वैकुंठाधीश श्रीविष्णूंनीं फार सुंदर रीतीनें जिंकली. आतां ठरल्याप्रमाणें त्यांना जें हवें असल तें बक्षीस त्यांनीं मागावें—"

इतक्यांत 'हां हां थांबा. शर्यत मीं जिंकली आहे मीं—तुम्हीं कोणींही नव्हे.' असें ओरडत गणपति धांवत नी धापा टाकीतच सभेच्या ठिकाणीं आला. सर्व देव आश्चर्यानें थक्क झाले.

विष्णु म्हणाले, "काय गणपति, तूं ही शर्यत जिंकलीस असें म्हणतोस ?"

"खात्रीनें" गणपति उत्तरला. "गणपति कधीं खोटें बोलत नसतो. हें तुम्हां सर्वांना माहीत आहे." "गणू बाळ, ही थट्टेची वेळ नव्हे. तूं शर्यत कशी जिंकलीस सांग पाहूं ? शंकर गंभीरपणें म्हणाले.

"अहो, कसची जिंकतोय् हा शर्यत! आम्हीं पाहिलें तर हा शर्यतीच्या रिंगणांत मुळीं कधींच नव्हता. अन् म्हणे मीं शर्यत जिंकली! काय थापेबाज आहे बेटा!"

"अहो वक्रतुंड, जरा संभाळून बोला. मोदकांतून कांहीं अंमली पदार्थ तर याच्या पोटांत गेला नाहीं असें भलतेंच बरळायला? याद राखून ठेव, गणोबा. अशा बनवाबनवीनें आम्ही मुळींच फसणार नाहीं." चंद्रानें तोंडसुख घेतलें.

"पण तुम्हांला फसवतोय् कोण. मी पुन्हा निक्षून सांगतों कीं, या शर्यतींत माझ्या एक सोडून तीन प्रदक्षिणा पुऱ्या झाल्या आहेत. बोला, सर्वांआधीं तीन प्रदक्षिणा चुटकीसारख्या पुऱ्या करणाऱ्या मला तुम्ही बक्षीस देणार, कीं खूप वेळांत जेमतेम एक प्रदक्षिणा पुरी करणाऱ्या विष्णूंना ते देणार?"

"अरेच्या, याच्या थापेबाजीचा आतां कळस झाला!" इंद्र ओरडला.

"खास ह्यानं आज आपल्या बापाच्या जालीम बटव्यावर हात मारलेला दिसतो." चंद्र हंसत हंसत म्हणाला.

"थांबा, त्याची थट्टा करूं नका. त्याचं म्हणणं तरी काय आहे तें ऐकून घेऊं या. गणपति, उगीच आम्हांला असा बुचकळ्यांत टाकूं नको. तूं तर प्रदक्षिणेंत मुळींच धांवला नाहींस असें सर्वांच्या सांगण्यावरून दिसतें. आणि तरी देखील तूं ही शर्यत जिंकलीस असें म्हणतोस. तर हें कसें?"

"तेंच तर सांगण्याचा मी मघापासून यत्न करीत आहें. पण हे सभ्य लोक मला बोलूं देतील तर कीं नाहीं! हें पहा, विष्णो,

तुमचं आमचं काय बरं ठरलं होतं? तर स्वर्गाला प्रदक्षिणा करायची. आतां मी तुम्हांला असं विचारतों कीं, 'जननी जन्मभूमिश्च स्वर्गादपि गरीयसी' हें वचन तुम्हांला मान्य आहे ना? झालें तर. तुम्ही सर्व देव प्रत्यक्ष स्वर्गलोकाची प्रदक्षिणा करण्याकरितां मारे धूम धांवत सुटला. **माझा स्वर्ग म्हणजे माझी आइ.** तिच्या भोंवतीं मीं एक सोडून तीन प्रदक्षिणा तेव्हांच घातल्या. आणि बसलों स्वस्थ. तर मग सांगा, मीं ही शर्यत जिंकली कीं नाहीं?" गणपतिबाप्पांनी सरळ सवाल टाकला.

त्यावर इंद्रचंद्रादिकांनीं एकच गिल्ला केला! व गणपतीच्या या कोटिक्रमाला पोरकट, खुळचट अशीं नांवें ठेवून ते त्याला हंसूं लागले. विष्णूंनीं क्षणभर गंभीर मुद्रा करून विचार केल्यासारखें केलें व शेवटीं उच्चस्वरानें सभेस उद्देशून ते म्हणाले, "देवहो, माझ्यावर तुमच्या सर्वांचा विश्वास आहे ना?" सर्वांनीं एकमुखी होकार दिला. विष्णु पुढें म्हणाले, "तर माझा निर्णय शांत चित्तानें ऐकून घ्या. ही अपूर्व शर्यत आज गणपतीनेंच जिंकली. कारण थोड्या श्रमांत होणाऱ्या कार्याकरितां बहुत श्रम खर्ची घालणारे आपण सर्वच मूर्ख ठरलों. गणपतीची बुद्धि अचाट आणि म्हणून त्याच्या विशाल दिसणाऱ्या डोक्यांत ही नामी शक्कल आली. शक्तिपेक्षां बुद्धीनेंच अधिक कार्यें होतात. आज गणपतीनें आपणांस हा छानच धडा शिकवला. बोला तर गणपति बाप्पा की जय!!" सर्वांनीं जयजयकारांनी स्वर्गलोक दणाणून सोडला. आणि गणपतीनें मग बक्षीस म्हणून काय मागून घेतलें, आहे ठाऊक? आपली सदानूकदा चेष्टा करणाऱ्या व वेळोवेळीं आपल्या मोठ्या पोटाला दांत विचकून

हंसणाऱ्या इंद्रादिकांचे दांत त्यांच्याच घशांत घालायचा त्यानें निश्चय केला होता. त्याप्रमाणें त्यानें मागितलें कीं, "हरएक कार्यांत माझी पूजा सर्व देवांच्या आधीं झाली पाहिजे. इंद्रादिक मत्सरी आणि थट्टेखोर देवांची पूजा आजपासून निदान पृथ्वीवर तरी वर्ज झाली पाहिजे." गणपतीचें मागणें मान्य करण्यावांचून देवांना गत्यंतरच नव्हतें. करतात काय? आणि मग तेव्हांपासून गणपतीला **अग्रपूजेचा मान** सर्वत्र मिळूं लागला. लहान मूर्ति पण थोर कीर्ति! नाहीं का? या प्रकारानें इंद्राला लाजेनें मेल्याहून मेल्यासारखें झालें. चंद्राचें तोंड तर काळें ठिक्कर पडलें. मुलांनो, अजूनही तुम्हांला त्याच्या तोंडावर डाग दिसतो ना?



# २. शाबास ! रघुपति, शाबास !!

एक होता राजा. त्याला हत्ती पाळण्याची फार आवड होती. त्याच्या हत्तीखान्यांत दहा वीस हत्ती होते. परंतु त्या सर्वांत रघुपति नांवाचा हत्ती त्याचा अतिशय लाडका होता. रघुपतीनें शिकारींत अनेक वेळां राजाचे प्राण वांचविले होते. त्यामुळें राजाचें रघुपतीवर अतिशय प्रेम जडलें. तो त्याची खास तैनात ठेवी. आणि त्याच्याकरितां लागेल तेवढा खर्च करी.

एके दिवशीं दुर्दैवानें असें झालें कीं, रघुपतीच्या एका डोळ्यास कांहींतरी विलक्षण रोग झालेला आढळून आला. लगेच त्याच्या माहुतानें जाऊन राजास ती गोष्ट कळविली. राजानें समक्ष पाहून तावड-तोब राजवैद्यास बोलावणें धाडलें. राजवैद्य आल्यावर त्यानें त्या हत्तीस नीट तपासलें व तो राजेसाहेबांस म्हणाला, "सरकार, याला एक वाईट नेत्ररोग झाला आहे व तावडतोब उपचार केले नाहींत तर याचा डोळा कायमचा जाईल." हें राजवैद्याचें बोलणें ऐकून राजा फार घाबरून गेला व राजवैद्यास म्हणाला, "वैद्यबुवा, वाटेल तें करा पण याचा डोळा बरा करा."

वैद्यानें आपल्या बटव्यांतून एक दिव्य वनस्पति काढली, ती उगाळून गाईच्या तुपांत खलून तयार केली आणि माहुतास हत्तीला जमिनीवर उताणें निजवण्यास सांगितलें. हत्ती उताणा झाल्यावर वैद्य-

बुवांस भीति वाटत होती म्हणून त्याचे पाय घट्ट दोरीनें बांधण्यांत आले. त्यावर वैद्यबुवांनीं रघुपतीच्या दुखऱ्या डोळ्यांत तें तयार केलेलें औषध घातलें. परंतु तें औषध इतकें जालीम व झोंबरें होतें कीं हत्तीच्यानें तें सहन करवेना. तो उठण्यासाठीं धडपड करूं लागला. त्या धडपडींत त्यानें पायांना बांधलेलें दोरखंड तोडलें व तो एकाद्या पिसाटाप्रमाणें चवताळून उठला आणि वैद्यबुवांच्या मागें लागला. त्याच्या माहुतानें त्याला आवरण्याचा पुष्कळ यत्न केला पण व्यर्थ. वैद्यबुवांनीं चलाखी करून पलीकडेच असलेल्या एका बारीकशा दारांतून एका घरांत प्रवेश केला म्हणून बरें झालें, नाहीं तर त्यांची कांहीं धडगत नव्हती ! ज्या घरांत वैद्यबुवा शिरले होते त्याच्या भिंतीवर ढुशी मारून ती हत्तीनें जवळजवळ पाडून टाकली. पण तितक्यांत माहूत व इतर चाकरांनीं त्याला कबजांत आणलें आणि त्याला घट्ट बांधून आपल्या जागीं आणलें. राजानेंही त्याला नाना तऱ्हांनीं चुचकारून शांत करण्याचा प्रयत्न केला. त्या औषधाचें झोंबणेंही आतां थोडें कमी झालें होतें. रघुपति थोड्या वेळानें शांत झाला. वैद्यबुवा मागल्या दारानें निसटून देवाचे आभार मानीत आपल्या घरीं परत आले.

त्यानंतर पुढें दोन तीन दिवसांनींच वैद्यबुवांच्या दिव्य वनस्पतीचा परिणाम दिसून आला. रघुपतीचा डोळा पुष्कळ बरा झालेल आढळून आला व त्याला पूर्वीप्रमाणेंच परत हुषारी वाटूं लागलेली दिसून आली. राजाला फार आनंद झाला व त्यानें वैद्यबुवांचे आभार मानून त्यांना शंभर रुपये बक्षिसादाखल पाठविले. परंतु राजाचा हा आनंद फार दिवस टिकला नाहीं. कारण एक डोळा बरा होतो न होतो तोंच रघुपतीच्या

दुसऱ्या डोळ्यालाही अगदीं हुबेहुब तसाच रोग झाल्याचीं चिन्हें दिसूं लागली. राजाला फारच काळजी वाटूं लागली. कारण फिरून तेंच औषध घालायचें म्हणजे पुनः वैद्यबुवावर प्राणसंकट ओढायच. शिवाय वैद्यबुवा या वेळीं औषध घालायला मुळीं कबूल सुद्धां व्हावयाचे नाहींत असें त्यास साहजिकच वाटत होतें. खरेंच आहे. जाणून बुजून कोणता वैद्य आपले प्राण धोक्यांत घालून रोग्याला उपचार करायला तयार होईल ? खेरीज,. हा रोगी तरी असा तसा सामान्य होता ! वैद्याला माहीत होतें कीं, हत्तीची सूडबुद्धि तशीच स्मरणशक्ति अजब असते. तेव्हां राजाला मोठा पेंच पडला. पण मग राजवैद्यावांचून आपल्या आवडत्या हत्तीला कोण बरें बरा करील ? राजानें वैद्यास आपल्या वाड्यांत एकीकडे बोलावून त्याला पुष्कळ समजाविलें व "तुमच्या प्राणांची मी हमी घेतों" असें सांगून व भल्या मोठ्या इनामाचें अमिष दाखवून त्याला फिरून एकदां रघुपतीस औषधोपचार करण्यास तयार केलें.

झालें. रघुपति मागील खेपेप्रमाणें चळवळ करील म्हणून त्यास नीट बंदोबस्तानें बांधलें. अन् मग आतां धोका नाहीं असें पहातांच वैद्यबुवा आपला बटवा घेऊन भीतभीतच पुढें सरसावले. पण या खेपेस आश्चर्य हें कीं, रघुपतीनें वैद्यराज दृष्टीस पडतांच सोंडेनें त्यांना सलाम केला, माहुतानें फर्मावण्यापूर्वींच तो आपण होऊन गुडघे मोडून मागच्या खेपेप्रमाणें उताणा झाला आणि आपल्या मुद्रेनें व नजरेनें त्यानें जणों वैद्यबुवांस "तुमचें तें औषध माझ्या दुखऱ्या डोळ्यांत टाका." असें पाचारण केलें. हा प्रकार पाहून तेथील सर्व मंडळी आश्चर्यानें स्तंभितच झाली. वैद्यबुवांना आतां चांगलाच धीर

आला होता. त्यांनीं बटवा सोडून पूर्ववत् औषध तयार केलें व कांपऱ्या हातानें तें रघुपतीच्या डोळ्यांत घातलें. आणि आपण स्वतः टुण्दिशीं उडी मारून दूर जाऊन एका सुरक्षित जागीं उभे राहिले. पण इकडे रघुपतीनें हूं कीं चूं केलें नाहीं, तो अगदीं स्वस्थ पडून होता. त्याला अतिशय वेदना होत होत्या असें त्याच्या एकंदर स्थितीवरून दिसत होतें. पण तो सर्व दुःख निमूटपणें सहन करीत होता. माहुतानें त्याचे पाय मोकळे केले. तो उठून उभा राहिला व त्यानें फिरून एकदां जेथें वैद्यराज दूर उभे होते, त्या दिशेकडे पहात आपली सोंड उभारून नरमाईनें त्यांस प्रणाम केला.



वैद्यांनीं उत्तर देण्यापूर्वीच रघुपतीनें आपल्या सोंडेनें राजाचा बहुमोल कंठा वैद्यबुवांच्या गळ्यांत घातला.

हा आपल्या आवडत्या हत्तीचा शहाणपणा पाहून राजेसाहेब फार खूप झाले व वैद्यराजांना त्यांच्या कामगिरीबद्दल काय बक्षीस द्यावें याचा

ते विचार करूं लागले. त्यांनीं वैद्यबुवास पुढें येण्यास सांगितलें. ते येतांच "तुम्ही माझ्या रघुपतीस पुनः दृष्टि दिल्याबद्दल तुम्हांला मी काय बक्षीस देऊं?" असें राजानें वैद्यांस विचारलें. वैद्यांनी उत्तर देण्या-पूर्वीच रघुपतीनें आपल्या सोंडेनें राजाच्या गळ्यांतील बहुमोल मोत्यांचा कंठा काढून घेऊन तो वैद्यबुवांच्या गळ्यांत अलगद घातला व त्यास गुडघे टेकून डोकें लवून नमस्कार केला.

राजाला आपल्या लाडक्या हत्तीच्या चातुर्याबद्दल धन्यता वाटली. आजूबाजूचे लोक तर हा चमत्कार पाहून आश्चर्यानें थक्कच झाले. अनेकांच्या तोंडांवाटे "शाबास! रघुपति, शाबास!!" असे उद्गार एकाच वेळीं बाहेर पडले.

मुलांनो, हत्तीच्या शहाणपणाची ही गोष्ट तुम्हांला आवडली ना?

---

# ३. सृष्टिवेडा मोहन.

मुलांनो, मोहन नांवाचा एक तुमच्यासारखा छोटा मुलगा होता. तो आईबापांचा फार लाडका होता. परंतु तो जसजसा मोठा होऊं लागला तसतशी त्याच्याबद्दल आईबापांना जास्तच काळजी वाटूं लागली. कारण मोहन जरी मोठा हुशार व गुणी मुलगा होता, तरी त्याच्यांत एक मोठा दोष होता. तो म्हणजे शाळेंतल्या अभ्यासापेक्षां त्याचें लक्ष सभोंवतालीं पसरलेल्या अफाट सृष्टींतील अनेक प्रकारच्या घडामोडींकडे जास्त असे. तो शाळेंत वेळेवर जाई पण शाळा सुटतांच तो जवळच असलेल्या समुद्राच्या वाळवंटांत जाऊन बसे. आणि तेथील शोभा पहाण्यांत तो इतका दंग होऊन जाई कीं मोहन अजून घरीं कां आला नाहीं म्हणून त्याचे वडील किंवा आई त्यास शोधावयास येई व त्यास घरीं घेऊन जाई.

मोहनच्या शाळेंतील मुलांनी तर त्याला वेडा ठरविलें होतें. कारण तो मुलांत फारसा मिसळत नसे. त्याचे मित्रही अगदींच थोडे होते. तो कोणाशीं बोलूं लागला तर त्याच्या बोलण्याला कांहीं ताळमेळ नसायचा. कोणताही विषय काढा, त्यांत कारण नसतां समुद्र, वादळ, ढग, वीज, डोंगर, पक्षी, नद्या, फुलें या गोष्टी त्याच्या बोलण्यांत हटकून यावयाच्या. मुलें सहलीला गेलीं म्हणजे मात्र त्याला खराखुरा आनंद होई. इतर मुलें खाण्यापिण्यांत व खेळण्यांत रमत. तर हा आपला कुठें तरी दूर एकीकडे जाऊन बसे अन् कुठें तरी दूरवर दृष्टि लावून विचारांत गर्क होऊन जाई. मुलें त्याला वेडा म्हणत पण शिक्षक त्याला 'सृष्टिवेडा' समजत.

त्याचा हा 'वेडेपणा' जावा म्हणून त्याच्या आईवडिलांनीं पुष्कळ यत्न करून पाहिले. डॉक्टरी उपाय केले, नवससायास केले,

पंचाक्षरी, देवऋषि करून पाहिले. पण व्यर्थ ! दिवसेंदिवस मोहनचा भ्रमिष्टपणा वाढतच चालला.

ते दिवस पावसाळ्याचे होते. त्या दिवशीं पाऊस खूप जोरानें पडत होता. कां कोणास ठाऊक ? मोहन त्या दिवशीं मोठ्या खुषींत दिसत होता. रोजच्या प्रमाणें तो शाळेंत गेला. पण बरींच मुलें पावसानें भिजून चिंब झाल्यामुळें त्या दिवशीं शाळा लवकरच सुटली. मग मोहनचा आनंद काय विचारावा ? तो तडक आपल्या वाळवंटा-तील आवडत्या जागीं गेला व तेथें डोक्यावर छत्री धरून वाळू ओली असतांना देखील तेथें बसून राहिला. त्याचें सर्व लक्ष समुद्राच्या उस-ळत्या लाटांकडे व त्यांचेवर वारंवार गडगडत असलेल्या ढगांकडे लागलें होतें. मधून मधून ढगांत विजेचा चमचमाट होई त्यानें त्याचे डोळे दिपून जात. पण त्याला त्या वादळाची भीति न वाटतां उलट खूप मौज वाटत होती असें त्याच्या हंसऱ्या चेहऱ्यावरून स्पष्ट दिसत होतें. थोड्या वेळानें पाऊस थांबला. मोहनचें सारें लक्ष आकाशांतून इवें तिकडे बेछूटपणें हिंडणाऱ्या ढगांकडे लागलें होतें. त्यांचा आकाशांतील पाठाशिवींचा खेळ पाहून त्याला त्या वेळीं त्या ढगांचा जणूं हेवा वाटूं लागला. तो एकतानतेनें त्यांची गंमत पाहण्यांत गर्क झाला.

इतक्यांत काय चमत्कार ! मोहनला एक विलक्षण दृश्य दिसलें ! समुद्रांतून दोन सुंदर नागकन्या वर आल्या आणि त्यांनीं त्यास ‘ आमच्या-बरोबर खेळायला येतोस का ? ’ म्हणून मोठ्या लडिवाळपणें विचा-रलें. मोहनला आणखी काय हवें होतें ! छत्री व पुस्तकें तेथेंच टाकून धांवतच तो त्या सुंदर जलदेवींकडे गेला. अन् त्यांच्या हातांत हात घालून त्यानें समुद्रांत बुडी मारिली. त्या नागकन्यांनीं

त्याला समुद्राच्या तळाशीं नेलें. तेथलें वैभव व शोभा पाहून मोहनचे तर डोळे दिपून गेले! मोहनला वाटलें, आज आपल्या डोळ्याचें पारणें फिटलें. त्या जलदेवतांनीं मोहनला आपल्या राजापुढें उभें केलें. तो समुद्रदेव होता. समुद्रदेवानें मोहनला जवळ बोलावलें. व प्रेमानें त्याच्या पाठीवर थोपटून त्यास विचारलें, "बाळ, तुझी काय इच्छा आहे, सांग. ती आम्ही ताबडतोब पुरी करूं."

मोहन म्हणाला, "महाराज, आपली आज्ञा असेल तर सांगतों. मला ढग व्हावेंसें वाटतें. कराल का मला ढग?" समुद्रदेव म्हणाले, "ठीक आहे. तुझी इच्छा पूर्ण होईल. देवींनो, जा याला मेघालयांत घेऊन, अन् याला ढगाचें रूप द्या."



जलदेवतांनीं मोहनला आपल्या राजापुढें उभें केलें

त्या दोघां जलदेवतांनीं मोहनला मेघालयांत नेलें, त्याचा मनुष्य-वेष काढून ठेवला व लगेच त्याला ढगाचें रूप दिलें. मोहन आतां इतका हलका फूल झाला होता कीं, लागलींच तो समुद्राच्या वर आला आणि मोठ्या मजेनें आपल्या नूतन देहाकडे कौतुकानें व डौलानें पहात इकडे तिकडे हिंडूं फिरूं लागला. समुद्रावर थोडा वेळ भ्रमण करून तो आकाशांत उंच उंच जाऊन आपल्या शाळेच्या इमारतीकडे थोडा वेळ पहात उभा राहिला. तेवढ्या उंचीवरून त्याला शाळेची इमारत किती म्हणून लहान दिसत होती ! फार काय ? सर्व शहरच त्याला आतां एखाद्या नकाशाप्रमाणें छोटेसें नी सपाट दिसूं लागलें. आतां त्याला आपल्या घराची आठवण झाली. अन् त्यासरशीं तो वेगानें पुढें सरकला व घर दिसूं लागतांच तो थोडा खालीं उतरून अगदीं आपल्या गच्चीपर्यंत आला. गच्चीवर त्याची आई कांहीं तरी काम करीत असलेली त्याला दिसली. तिला हांक मारून आपलें नवीन रूप दाखवून तिला चकित करावें असे त्याच्या मनांत आलें. पण शब्दच उमटेना ! मग त्याला कळून चुकलें कीं आपल्याला मनुष्याच्या वाणीनें बोलतां येत नाहीं. ‘ अरेरे ! आपल्याला माणसांची बोली बोलतां आली असती तर फार बरें झालें असतें !’ मोहन हळहळला. त्याला फार वाईट वाटलें कीं, आपल्या घरापर्यंत येऊन आपल्याला आईबरोबर या नव्या स्वरूपांत बोलतां येत नाहीं. त्याच्या डोळ्यांना टचकन पाणी आलें व तें त्याची आई होती तेथेंच नेमकें पडलें ! आईला वाटलें, पाऊस आला, म्हणून ती गच्चीच्या जिन्यावरून धांवतच खालीं घरांत गेली. मोहनची फार निराशा झाली. नाइलाजानें त्यानें तेथून काढता पाय घेतला. इकडे तिकडे भटकत त्यानें थोडा वेळ खूप मौज केली. थोडें वरवर जावें, परत खालीं खालीं यावें, परत वरवर जावें. यांत त्याला खूप गंमत वाटली.

अशा गमतींत तो दंग असतां एकाएकीं कोणीं तरी त्याला जोरानें धक्का मारला. मोहन म्हणाला, "काय रे, तुझे डोळे फुटले का? दिसत नाहीं तुला दुसऱ्यांना धक्के मारतोस तो?"

तो दुसराहि ढगच होता. तो म्हणाला, "अरे छवड्या, तूं मौज करायला का आला आहेस इथं? कामबीम नाहीं वाटतं तुला कांहीं? हे दिवस धांदलीगडबडीचे अन् तूं खुशाल इथं मजा मारीत बसला आहेस काय?"

मोहन म्हणाला, "ढगांनीं मजा मारायची नाहीं, तर काय हमाली करायची? वाटेल तिकडे फिरण्यापलीकडे अन् विद्युल्लतेबरोबर खेळण्यापलीकडे त्यांना काय रे एवढं काम असतं?

दुसरा ढग म्हणाला, "वा:, काय काम असतें! तूं आमच्या सृष्टींत नवीनच प्राणी आलेला दिसतोस! अरे, तुला कोणीं मौज मारायला वाऱ्यावर सोडून दिलें आहे की काय? ढगांचें आयुष्य ख्यालीखुशालीचें नसतें बरें बाबा! तें फार खडतर!"

मोहन म्हणाला, "अरे, काय म्हणतोस तरी काय? मी तर समजतों कीं ढगाचं आयुष्य अतिशय सुखाचं. आणि म्हणून तर मी ढग झालों."

दुसरा ढग म्हणाला, "अस्सं! तर मग तूं मूळचा माणूस? होय ना? मग बरोबर! मजा करण्याकरितां ढग झालास! वा:!! तर मग आतां चांगलीच मजा तुझ्या अनुभवास येईल. मी आतां जातों. मला आतां तुझ्याशीं बोलायला वेळ नाहीं. तो पहा आमचा नाईक विजेचा चाबूक घेऊन आलाच आमच्या पाठोपाठ. कामांत कुचराई केली कीं

बसेल पाटींत तो चाबूक, आहे ठाऊक ? नांवचा वारा आहे तो. त्याच्या सपाट्यांत सांपडलास म्हणजे कळतील काय हाल आहेत ते !"

इतकें बोलून तो दुसरा ढग पुढें वेगानें सटकला. मोहन आश्चर्यानें स्तंभित होऊन त्याच्या झपाट्यानें धांवणाऱ्या आकृतीकडे आ वांसून पहात उभा राहिला. इतक्यांत विजेचा एक बारीक फटकारा त्याला बसला. त्याबरोबर तो भानावर आला. पहातो तों वारा वेगानें धांवत होता व त्याला आपल्या-पुढें खेंचून रेटून नेत होता. आणखी बरेच ढग वाऱ्यानें मेंढरांप्रमाणें जमा केले होते व त्यांना तो जोरजोरानें पुढें हांकीत होता. आपणांस हा कोठें नेत आहे याची मोहनला मुळींच कल्पना येईना. तो मोठमोठ्यानें त्या धटिंगणाचा निषेध करीत होता. पण आणखी एक चाबकाचा फटकारा मारून त्यानें मोहनचें तोंड कायमचें बंद करून टाकलें. मोहनचा वेग आतां ताशीं ३०-३५ मैल तरी असावा. त्याच्या गांवच्या आगगाडीच्या वेगापेक्षां हा वेग त्याला कितीतरी जास्त वाटला. ढगांची पलटण जोरजोरानें धांवत होती. मोहनला धांवण्याची संवय नसल्या-मुळें त्याची खूप त्रेधा उडत होती ! त्यांतच मधून मधून विजेचा चाबूक जोरानें कडाडायचा. " छे! छे ! ! उगीच आलों आपण इथें सुखाचा जीव दुःखांत लोटायला ! " मोहन स्वतःशींच पुटपुटत होता.

ढगांची ही पलटण आतां नद्या, नाले, गांवें, शहरें, अरण्यें, दऱ्या, खोरीं, भराभर मागें टाकीत खूप जोरानें धांवत होती. धांवण्यांत कोणीं कुचराई केली कीं वारा त्याला फटकावी. अशा रीतीनें कितीतरी वेळ ते सर्व ढग व त्यांतच आपला मोहनहि धांवत होता. शेवटीं एक खूप उंच उंच पर्वत त्यांच्या वाटेंत उभा असलेला त्यांना दिसला.

मोहनला वाटलें, आतां आपला नाईक जो वारा तो आपल्याला वळायचा हुकूम देईल. पण छे! वाऱ्यानें निराळाच हुकूम दिला. "हंऽ मर्द हो, अंगांतलें सर्व बळ एकवटून या समोरच्या डोंगरी राक्षसाच्या अंगावर धांवून चला. माघार घेऊं नका." त्याबरोबर सर्व ढग समोरच्या पर्वताच्या अजस्र तटावर तुटून पडले. मोहनहि त्यांत होताच. आपला आतां कपाळ-मोक्ष होणार हें त्याला माहीत होतें पण करतो काय? इतरांच्या बरोबर तोहि त्या पर्वतावर जोरानें आदळला आणि त्याचें पोट फुटलें. त्यांतलें जवळ जवळ एक हौदभर पाणी बाहेर पडतांच मोहनला अचंबा वाटला. त्याला कळेना कीं हें एवढें पाणी आपल्या पोटांत केव्हां सांठून राहिलें होतें? तरीपण आतां विचार करण्याची वेळ नव्हती.

पर्वतावर आदळून फुटल्यानंतर पाण्याच्या एका खूप मोठ्या लोंढ्या-बरोबर भराभर या कड्यावरून त्या कड्यावर अशा उड्या घेत घेत मोहन एका मोठ्या नदींत येऊन पडला व तेथून वहात वहात परत आपल्या गांवच्या समुद्रांतच आपण आल्याचें त्याला आढळून आलें. कारण समु-द्रांत येतांच त्या पूर्वीच्याच जलदेवतांनीं त्याचें हंसून स्वागत केलें व त्याला हाताशीं धरून पुन्हां एकदां समुद्रदेवाकडे नेलें.

"का बाळ? मजा आहे ना या तुझ्या नव्या आयुष्यांत?" समुद्र-देवानें विचारलें.

"महाराज, आपण रागावणार नसाल तर सांगतों." मोहन म्हणाला.

"खुशाल सांग. मी बिलकूल रागावणार नाहीं. तूं मला फार आव-डतोस. तुला कोणाचें भय बाळगण्याचें कारण नाहीं." समुद्रदेवानें त्यास आश्वासन दिलें.

"महाराज, आपण अतिशय दयाळू आहां. मज बालकाचें कोड पुरविण्यासाठीं मला आपण ढगाचें रूप दिलें. पण माझा भ्रम आतां दूर झाला. ढगाचें आयुष्य दुरून माझ्या कल्पनेला मोठें सुखाचें अन् गंमतीचें वाटत होतें. पण प्रत्यक्ष अनुभवानें मला कळून चुकलें कीं दिसतें तसें नसतें. प्रत्यक्ष व कविकल्पना यांतलें अंतर आज मी चांगलें शिकलों. महाराज, मला पूर्ववत् मनुष्याचें रूप द्या व मला आपल्या घराकडे जाऊं द्या. दया करा माझ्यावर. माझे आईबाप माझ्यावांचून तळमळत असतील. त्यांचें माझ्यावर अतिशय प्रेम आहे. पण मी मात्र वेड्यासारखा वागून त्यांना आजवर त्रास दिला. आतां माझे डोळे उघडले. मला पूर्वींचा मोहन करा व माझ्या घराकडे पोंचवा." मोहननें मोठ्या नम्रपणानें सांगितलें.

समुद्रदेव म्हणाले, "बाळ, घाबरूं नको. तुला पूर्ववत् मी मानवाचें रूप देतों. पण लक्षांत ठेव, मानव या नात्यानें आपलें कर्तव्य बजावण्यांत तूं इतःपर कुचराई करूं नको. सृष्टींत ज्यानें त्यानें आपआपलें कर्तव्य बजावावें हाच ईश्वराचा हेतु आहे. भ्रमिष्टपणा सोडून दे व नीट अभ्यास करून आईबापांस संतोष दे. अन् मोठा होऊन आपल्या कुटुंबाचें, समाजाचें व देशाचें हित करण्याचा यत्न कर. जा आतां." असें बोलून समुद्रदेवानें त्यास आपल्या हातांतील माणीकमोत्यांनीं मढविलेल्या सोन्याच्या दंडानें स्पर्श केला व मोहन पूर्ववत् मनुष्यरूपधारी झाला. समुद्रदेवानें खुणावतांच त्याला त्या दोघा जलदेवतांनीं परत समुद्रांतून वर आणून त्याच्या नेहमींच्या जागीं आणून सोडलें व आपण तात्काळ अदृश्य झाल्या. झालेला प्रकार इतका अकल्पित झाला कीं, त्यावर विचार करीत मोहन क्षणभर

किनाऱ्यावर बसून राहिला तोंच त्याच्या वडिलांनीं त्याला खांद्यास धरून गदगदा हलवीत म्हटलें, " अरे मोहन, काय हें ? एवढी रात्र पडली तरी तुला घरीं नाहीं का यायचें ? एवढा वेळ इथें बसून काय करीत होतास ? "

शेजारीं एक गृहस्थ होते. ते म्हणाले, "अहो, आम्ही केव्हांपासून पाहतों आहोंत, हा मुलगा पावसांत छत्री डोक्यावर धरून वेड्यासारखा बसून आहे इथं. तुमचा मुलगा वाटतं ? "

वडील म्हणाले, " होय. तो असाच रोज येऊन बसतो इथें तासन् तास. "

मोहन म्हणाला, "बाबा, चला लौकर घरीं, आई वाट पहात असेल."

घरीं आल्यावर त्यानें आईवडिलांना सर्व हकीकत सांगितली. त्या दिव-सापासून मोहनच्या एकंदर वागणुकींत इतका आश्चर्यकारक पालट झाला कीं हा पूर्वींचाच मोहन म्हणून सांगितलें असतें तर तें कोणाला खरें वाटलें नसतें. मोहनच्या आईबापांचा आनंद गगनांत मावेना. मोहनहि तेव्हांपासून अभ्यासाकडे व व्यायामाकडे लक्ष देऊं लागला. तो वर्गांत पहिल्या प्रतीचा हुशार विद्यार्थी म्हणून ओळखला जाऊं लागला.

मात्र बरेच दिवसपर्यंत कोणीं त्यास समुद्रावर फिरावयास येतोस का म्हणून विचारलें तर तो स्पष्ट नकार देई व सर्वांना त्याबद्दल फार अचंबा वाटे. पण त्या गोष्टींतलें रहस्य मोहनला किंवा त्याच्या आई-वडिलांनाच ठाऊक ! दुसऱ्या कोणालाही तें रहस्य कधींच कळलें नाहीं !

—***०***—

# ४ उंटाची भविष्यवाणी.

फार फार प्राचीन काळची गोष्ट. एक मोठें अरण्य होतें. त्यांत नाना प्रकारचीं श्वापदें रहात होतीं. परंतु तीं सर्व एकवर्गीय म्हणजे शाकाहारी होतीं. तीं एकमेकांना खात नसत. सर्वांचा राजा हत्ती होता व तो सर्वांचें संकटांपासून रक्षण करी. हत्ती हा बळ, बुद्धि, औदार्य, न्याय वगैरे गुणांनीं सर्व प्राण्यांत श्रेष्ठ होता. त्यामुळें सर्व प्राणी मोठ्या गुण्यागोविंदानें तेथें नांदत. अरण्यांत झाडपाला, गवत, फळें, रानटी धान्यें वगैरे त्यांना भरपूर खावयास मिळत व भांडणाचे प्रसंग क्वचितच येत.

परंतु 'जगीं सर्व सूखी असा कोण आहे' या न्यायानें गजराज्याला सुद्धां ग्रहण लागावें असा जणूं ईश्वरी संकेत होता. कोठून कां होईना, या प्रकारें एकवर्गीय पशु असलेल्या या अरण्यांत भिन्नवर्गीय प्राणी बाहेरून घुसल्याचें एक दिवस अकस्मात् दृष्टोत्पत्तीस आलें. या वर्गाचा नायक सिंह असून वाघ, रानडुकर, गेंडा, लांडगा, अस्वल वगैरे हिंस्र पशु बंडखोर किंवा दरोडेखोराप्रमाणें वरील गजराज्यांत हवा तो धुमाकूळ घालूं लागले.

गजराज्यांतील अहिंसक प्राण्यांची संख्या झपाट्यानें घटूं लागली. व हा प्रकार जर यापुढें असाच चालू राहील तर लौकरच आपलें राज्य नामशेष होईल याची हत्तीस काळजी पडून त्यानें आपल्या प्रजाजनांच्या सर्व प्रतिनिधींची एक तांतडीची मोठी सभा बोलविली.

सभेचें काम इतकें गुप्त राखण्यांत आलें होतें कीं या कानाचें त्या कानाला सुद्धां कळणार नाहीं !

सभा गजराजांच्या रहाण्याच्या ठिकाणीं भरविली होती. सभोंवतीं कळकांचा अभेद्य तट होता व त्यास आंत जाण्यापुरती एक लहानशी वाट ठेविली होती. ठरल्यावेळीं सर्व शाकाहारी प्रतिनिधी एक एक असे सभेच्या ठिकाणीं हजर झाले. शत्रूला सभेची दाद देखील लागूं नये म्हणून प्रत्येकानें पूर्ण खबरदारी घेतली होती. आणि सभेची वेळ पण दुपारीं भर बारा वाजतांची होती. कारण ती वेळ हिंस्त्रांची डारडूर निजण्याची! होतां होतां सभेच्या ठिकाणीं हत्ती, घोडा यांखेरीज उंट, बैल, रेडा, हरीण, माकड वगैरे सर्व वनस्पतिभक्षक प्राणी जमले. बालवाचक हो, तुम्हांला ऐकून मोठी गंमत वाटेल कीं खार एवढीशी पण तीही या सभेच्या ठिकाणीं हजर होती. मी लहान, तेव्हां माझ्या हातून काय होणार असें तिनें म्हटलें नाहीं. आपल्याकडून होईल तितकें काम करण्याच्या दृढनिश्चयानें सभेच्या कामास हातभार लावण्याकरितां ती पुढें सरसावून आली होती.

राज्यांतील बहुतेक प्रमुख मंडळी आलेली पाहून हत्तीनें सभेच्या कामास सुरवात केली. तो म्हणाला, " मित्र हो ! आपण सर्वजण माझ्या बोलावण्यास मान देऊन या ठिकाणीं आलां याबद्दल मी आपला फार आभारी आहें. आपण येथें कोणत्या कारणाकरितां जमलों आहोंत तें तुम्हांस माहीतच आहे. तरी पण थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे आपले शत्रु जे हिंस्त्र पशु त्यांनीं आमच्या राज्यांत घुसून अपराधांवांचून आमच्या निरुपद्रवी व सज्जन प्रजेची जी क्रूर कत्तल चालविली आहे, तिजवर कोणता जालीम उपाय योजावा याचा विचार करणें हें आजच्या

सभेपुढचें मुख्य काम होय. तरी ज्याला जो कांहीं उपाय सुचेल तो त्यानें मोकळेपणानें पुढें मांडावा अशी मी सर्वांस विनंति करतों," एवढी प्रस्तावना करून हत्ती स्थानापन्न झाला.

व्यासपीठावर थोडा वेळ सभासदांत बरीच वाटाघाट झाली. त्यानंतर घोडा पुढें येऊन म्हणाला, "लोक हो! आपण सर्वांनीं मिळून आपल्या शत्रूशीं टक्कर द्यावयाची व त्याच्या भक्ष्यस्थानीं निमूटपणें पडण्याऐवजीं शूरासारखें लढून मरायचें. पहा तुम्हांला हा विचार पसंत पडला तर."

हरीण आपल्या जागेवरूनच म्हणालें, "घोडेदादा, तुमचें म्हणणें ठीक आहे. पण आपलें बळ किती व त्यांचें किती हें नको का पहायला?"

ससा म्हणाला, "त्यांच्याशीं उघड उघड लढून मरण्यापेक्षां मला वाटतें, त्यांच्याशीं युक्तीनेंच वागून आपण आपला बचाव केला पाहिजे. शत्रु बलाढ्य असला म्हणजे आपल्या सुरक्षित कोटकिल्ल्यांत चटकन् लपून बसणें यासारखी उत्तम युक्ति नाहीं. असले बालेकिल्ले शोधून काढून तेथेंच आपली नवी वसाहत वसविणें हा माझ्या मतें उत्तम उपाय आहे."

माकड म्हणालें, "त्यापेक्षां मी म्हणतों कीं, आपल्या शत्रूंपैकीं बहुतेकांना झाडांवर उंच चढतां येत नाहीं. तेव्हां तुमच्यापैकीं जे लहान प्राणी आहेत त्यांनीं झाडावर चढण्यास शिकावें. मी त्यांना वाटल्यास शिकवायला तयार आहें." या माकडाच्या बोलण्यानें सभेंत हंशा पिकला.

यानंतर कोणीं कांहीं, कोणीं कांहीं अशा निरनिराळ्या युक्त्या सुचविल्या पण त्यांपैकीं कोणतीच युक्ति कांहीं ना कांहीं अडचणीमुळें सर्वांस पसंत पडेना. शेवटीं हत्ती समारोपाकरितां उठणार इतक्यांत खार

चूं चूं करून ओरडली, " थांबा, मला दोन शब्द बोलायचे आहेत. मी तुम्हां सर्वांहून लहान म्हणून म्हटलं, माझं कोण ऐकून घेणार? पण आतां इतक्या युक्त्यांतून तुम्हांला एकही सर्वस्वीं पटली नाहीं, तेव्हां मी म्हटलं कीं, पाहूं यांना आपली छोटीशी युक्ति पसंत पडते का तें?" इतकें बोलून आपल्या बोलण्याचा काय परिणाम होतो तें पहाण्यासाठीं खारीनें एकदां सभोंवार नीट नजर फिरविली. सर्वजण ओरडले, "खारे, सांग, सांग काय तुझी युक्ति आहे ती."

खार म्हणाली, " आपल्या उत्तेजनानें मला धीर आला आहे. मी लहान म्हणून आपण माझी उपेक्षा केली नाहीं, ह्यांत आपला मोठेपणा दिसून येतो. आतां सांगतें माझी युक्ति. तुम्हांला ऐकून माहीतच असेल कीं, माणूस नांवाचा एक दोन पायांचा प्राणी आहे. तुमच्यापैकीं पुष्कळांनीं त्याला पाहिलेंहि असेल. मी तर झाडावरच्या सर्वांत उंच फांदीवरून पानांत लपून बसून त्याला कित्येकदां पाहिलें आहे."

माकड म्हणालें, " होय, मी पण त्याला पाहिलें आहे पुष्कळदां. इतकंच काय? पण मी मागच्या दोन पायांवर उभा राहिलों म्हणजे जसा दिसतों ना तसाच तोहि दिसतो."

खार पुढें म्हणाली, " होय तोच तो. पण वानरदादा, तो मोठा डोकेबाज अन् हिकमती प्राणी आहे बरं का! तो आपल्या हातांचाही उपयोग फार कुशलतेनें करतो. तेव्हां मी काय सांगत होतें? हां. त्या माणसाला आपण मित्र करून घेऊं म्हणजे त्याच्या मदतीनें हां हां म्हणतां आपल्या शत्रूंचाहि नाश होईल." त्यावर उंटानें आपली मान उंचावून एक दीर्घ शंका काढली. " वा खारूताई, तुमची युक्ति मोठी

नामी आहे. पण ती उंदरांनीं मांजराच्या गळ्यांत घांट बांधण्या इतकीच अशक्य कोटींतली आहे."

यावर सभेंत थोडासा हंशा पिकला. पण कांहींनीं हुश् हुश् करून सभासदांना गप्प केलें. हत्तीनें बोलण्यास खुणावतांच खार म्हणाली, "उंटमामांची शंका अगदींच चुकीची नाहीं. पण ते म्हणतात तितकी माझी युक्ति अशक्य नाहीं. कशी ती मी आतां सांगतेंच. हें पहा, माणूस हा प्राणी तसं पहायला गेलं तर पुष्कळच बाबतींत तुमच्या बहुतेकांपेक्षां शरीरानें अशक्त अन् दुबळा आहे. त्याला आपल्या सारखें जलद धांवतां येत नाहीं. त्याला मोठमोठीं ओझीं वहातां येत नाहींत. मीं माणसाला जमीन नांगरतांना पाहिलें, पण बिचाऱ्याची कोण त्रेधा! चार पावलें जाई दमे, चार पावलें जाई दमे! आणि इतकं दमून भागून काम करून शेवटीं फळ काय? तर पोटेंभर धान्य. त्याला धान्याची भारी आवड. तेव्हां मी म्हणतें, त्याच्याशीं मैत्री करायची म्हणजे त्याला आपण सांगायचं, "तुझं शेत आम्ही नांगरून देऊं, तुझ्या बागांना मोटेनं पाणी काढून पाजूं, तुला जलद कोठें जायचं असलं तर तुला आम्ही पाठीवरून नेऊं, तुझ्या मुलांना आम्ही दूध देऊं, तुला थंडी वाजूं नये म्हणून आम्ही गरम लोकर देऊं, तुझें जें जें काम करण्यासारखें असेल तें तें करूं. मग तर झालं? आणि याच्या मोबदल्यांत तूं आमचं एक काम करायचं आणि तें म्हणजे हे जे वाघ, सिंह आम्हांला वेळीं अवेळीं गट्टम् करतात त्यांना तूं ठार करायचं. आहे कबूल?" असं त्याच्याशीं मैत्रीचं बोलणें करायचं आणि त्यानं कबूल केलं कीं, याला सांगयचं प्रथम तूं आमच्या

अनेक शत्रूंपैकीं एकाला मारून दाखव म्हणजे आम्ही तुझ्या सेवेला सुरवात करतों अन् मग 'तूं सिंहाला मार म्हणजे तुझी नी आमची कायम मैत्री होईल. का? पटते का माझी युक्ति?"

हत्ती म्हणाला, "वा:! खारूताई, छान आहे. तुझी युक्ति मला अगदीं पसंत आहे. खरंच सभ्य हो, आपली खारूताई म्हणजे 'मूर्ति लहान पण कीर्ति थोर' अशी आहे. मित्रहो, तर मग काय? करायचं ना या खारूताईच्या युक्तीप्रमाणं?" उंटानें पुन्हां शंका उपस्थित केली, "युक्ति टीक आहे म्हणा! पण—"

रेडा म्हणाला, "पण काय रे उंटोजी," तुझा आपला 'पण' कधींच संपत नाहीं. भारी शंकेखोर बुवा तूं!"

उंट म्हणाला, "अरे बाबा, जेथें विवेक आह तेथें विचार आहे नी शंका ही असायचीच. तुला काय? रेडाच तूं. विचार करायची शक्तीच जिथं डोक्यांत नाहीं तिथं तुला शंका तरी कसली येणार!"

घोडा म्हणाला, "वा, इतका नको हिणवूं त्याला उंटोजी. त्याची शक्ति तरी आहे ना तुला ठाऊक?"

उंट म्हणाला, "घोडेदादा, उगीच घोडदौड मारीत सुटतोस तूं. बाबा रे, कोणतीही गोष्ट करण्यापूर्वी प्राण्यानें नीट मागचा पुढचा विचार करावा. तुमची घोडदौड म्हणजे 'ऊठ सोटा कूट" पैकीं असा-यची. मग तिथं प्राणावर बेतलें तरी बेहेत्तर. खारूताई, मी तुला असं विचारतों कीं हा तुझा माणूस का खाणूस काळा कीं गोरा, उंच कीं ठेंगू, धिप्पाड कीं चिपाड, कसला तो मी अद्याप मुळींच

पाहिला नाहीं. तूं म्हणतेस, तूं पाहिला आहेस अन् तुझ्या खरे-पणावर आमचा विश्वास आहे. पण समज, त्यानें आमच्याशीं मैत्री केली अन् आमच्या शत्रूंना सुद्धां जमीनदोस्त केलें. तरीपण प्रश्न असा शिल्लक रहातो कीं तो शेवटीं आमच्यावर उलटून तो आम्हांलाही कशावरून नेस्तनाबूद करणार नाहीं?

सर्वजण खारीकडे प्रश्नचिन्हाच्या नजरेनें पाहूं लागले.

खार म्हणाली, "उंटमामा, तुमची शंका निराधार आहे. आपण जर त्याच्या उपयोगीं पडणार आहों व त्याचें आमच्या मदतीवांचून चालणार नाहीं अशी स्थिति होईल? तर आम्हांला मारून तो स्वतःच्या पायांवर धोंडा पाडून घेण्याइतका मूर्ख कसा होईल?

हरीण म्हणालें, "तरी पण मला त्याची फार भीति वाटते खारूताई."

ससा म्हणाला, "मला पण."

खार म्हणाली, "तुम्ही दोघें भारीं भित्रीं आहांत. भित्र्या माणसाला जगांत कोणी विचारीत नाहीं. थोडी धीट व्हा धीट. भिण्यानं संकट टळत नाहीं. तर त्याला धीटपणें तोंड देण्यानंच त्याचा नाश करतां येतो."

हत्ती म्हणाला, "बंधुभगिनींनो, आतां वेळ फार झाला आहे. संध्याकाळ होत आली. आतां सभेच काम संपवलें पाहिजे म्हणजे ज्याला त्याला रात्र पडण्यापूर्वीं आपआपल्या मुक्कामीं सुरक्षित जाऊन पोंचतां येईल. तर मग ज्यांना खारीची युक्ति पसंत आहे, त्यींनीं पुढला एक पाय वर करावा!" त्यावर बहुतेकांनीं पुढल्या पायानें आपली संमति दर्शविली. आणि खारूताईंचे आभार मानण्यांत येऊन, दुसरे



'गजराजांचा दरबार'

दिवशीं पुढील कार्याची रूपरेषा आखण्याकरितां सभा दुपारीं बरोबर बारा वाजतां पुनः सुरू होईल असा खुलासा करून गजराजांनीं सभा बरखास्त केली.

— २ —

दुसरे दिवशीं परत त्याच ठिकाणीं दरबार भरून गजराज्यातर्फे माणसाकडे एक निवडक शिष्टमंडळ पाठविण्याचें ठरलें व त्याप्रमाणें माणूस शेतांत राबत असतां व विहिरींचें पाणी एकेका घागरीनें आणून झाडांस घालीत असतां नेमकें त्याच वेळीं शिष्टमंडळानें त्यास गांठलें. प्रथम

शिष्टमंडळांतील बाकीचे प्राणी जरा आड दूर उभे राहिले अन् खारू-ताई पुढें झाल्या. जी खार आपल्याला पहातांच झाडावर टुण् टुण् उड्या मारीत उंच जाऊन कोठेंतरी लपायची तीच आज आपल्याकडे धिमे-पणानें येत असलेली पाहून माणसाला आश्चर्याचा धक्काच बसला.

" काय ग पिटुकले, काय बेत आहे आज? "

" बेत मोठा आहे पण तूं आमच्याशीं सहकार्य करशील तर. "

" तुझ्याशीं सहकार्य? म्हणजे काय बोवा? "

"हें पहा, तें मी तुला सर्व सांगतें. पण मला किंवा माझ्या कोणत्याहि मित्राच्या केंसाला धक्का लावणार नाहीं असें वचन दिलेंस तरच मी पुढचें बोलणें करणार आहें. "

" हें घे वचन. माणूस आपल्या घरीं चालत आलेल्या पाहुण्याशीं कधींच विश्वासघात करीत नाहीं. "

" एकूण तुझ्या स्वभावाबद्दलची माझी परीक्षा खास चुकली नाहीं तर! मला फार आनंद झाला बघ तुझा हा नेकबाज स्वभाव पाहून. आतां मी तुझी माझ्या मित्रांशीं ओळख करून देतें."

असें बोलून तिनें चूं चूं असा तीनदां आवाज केला. त्याबरोबर गाय, घोडा, बैल आणि मेंढा हीं पुढें आलीं. सर्वांनीं डोकें थोडेसें खालीं वांकवून माणसाला राम राम केला. माणूस या त्यांच्या नम्र वागण्यानें फार खूष झाला. अन् खारीकडे वळून म्हणाला, " माझ्याशीं काय काम आहे तुमचं? " प्रथम खारीनें आपणांसह सर्वांची माणसांशीं ओळख करून दिली. अन् थोडक्यांत आपलें कार्य सांगितलें. गाईनें उठून लगेच त्याला तांब्याभर अमृतासारखें गोड दूध प्यावयास

दिलें. बैल त्याचा नांगर ओढूं लागला व कावडीनें तसेंच मोट ओढून भराभर पाणी त्यास पुरवूं लागला. घोड्यानें त्यास पाठीवर बसवून घेऊन वेगानें एक फेरफटका करून परत आणलें. मेंढीनें त्यास आपली लोंकर देऊन त्याचें गरम कापड करावयास सांगितलें. माणूस आश्चर्यानें दिङ्मूढ झाला. त्याचा आनंद त्याच्या पोटांत मावेना. त्यांच्या सेवेची ती तऱ्हा पाहून त्याला त्यांच्याबद्दल फार प्रेम वाटूं लागलें. त्यानें त्या सर्वांचें चांगल्या प्रकारें स्वागत केलें. गाई, बैल व मेंढा यांना त्यानें ताजें हिरवेंचार गवत दिलें आणि खारीस अक्रोडाचीं फळें दिलीं. सर्व जण पाणी प्याले. माणसाच्या आदरातिथ्यानें शिष्टमंडळास फार आनंद झाला. माणसानें शिष्टमंडळाचें सगळें म्हणणें ऐकून घेतलें. आणि आपण यांची जर मैत्री जोडूं तर आपला अतोनात फायदा होईल याची त्यास खात्री पटली. त्यानें ताबडतोब दोस्तीच्या करारावर सही करण्याची तयारी दर्शविली.

बराच वेळ झाल्यानंतर माणसाचे आभार मानून शिष्टमंडळ परतलें व दुसरे दिवशीं सभेंत त्यांनीं माणसाशीं झालेल्या आपल्या वाटाघाटीचा समग्र वृत्तांत सांगितला. कांहीं सभासद हर्षानें नाचूं लागले. परंतु उंट म्हणाला, “ माणसाचा यांत कांहीं तरी डाव असेल बरें ! पहा बोवा, करायला जाल एक अन् होईल भलतेंच. मित्र म्हणून त्याला करायला जाल मदत अन् व्हाल त्याचे कायमचे गुलाम. ” शुक् शुक् करून त्यास सर्वांनीं गप्प बसवलें. त्या नंतर हत्ती म्हणाला, “ उंटोजी, शिष्टमंडळ सांगतें त्यावरून माणूस फार सज्जन, उदार अन् दयाळू दिसतो. त्यानें शिष्टमंडळाचें जें हार्दिक स्वागत

केलें त्यावरून तर तो आपल्या प्रमाणेंच सभ्य व सज्जन असावा अशी खात्री पटते. तो विश्वासघातकी असता तर त्यानें तेथेंच शिष्टमंडळास गारद केलें असतें. कारण तुम्हीं खारूताईकडून आतांच ऐकलें कीं, माणसापाशीं तिरकमठा, भाला वगैरे अजब शस्त्रें आहेत अन् तो त्यांनीं वाटेल तें करूं शकतो. आपण मैत्रीसाठीं पुढें केलेला पाय त्यानें आपल्या हातानें प्रेमानें धरला आहे. तरी आतां तो झिडकारणं योग्य नव्हे. तरी बंधूंनो, माणूस आजपासून आपला बडा दोस्त अन् त्याच्या मदतीनें लौकरच आपण आपल्या बड्या दुष्मनांचा नाश करून सुखी होऊं असें मला वाटतें. तरी तुमचें जसें मत असेल तसें करा. मी राजा असलों तरी बहुमताची गळचेपी कधींच करणार नाहीं."

यावर गजराजांच्या नांवाचा लोकांनीं आदरानें त्रिवार जयजयकार केला व त्याच्या सांगण्यास होकार दर्शविला.

झालें. माणूस व गजराज यांची भेट करविण्यांत आली आणि दोघांच्या मित्रत्वाच्या करारावर सह्या झाल्या. परस्परांनीं परस्पराला हरएक बाबतींत मदत करणें ही करारांतील मुख्य अट होती.

— ३ —

सिंहवाघांचीं फिरण्याचीं टिकाणें खारीनें आधींच हेरून ठेविलीं होतीं. आतां मोहिमेचा दिवस ठरविण्यांत आला. आणि त्या दिवशीं सूर्यास्ताच्या सुमारास हत्तीचे पाठीवर बसून आपला तिरकमठा व लांबलचक अणकुचीदार भाला सज्ज करून मागें घोडा, एका बाजूस रेडा, एका बाजूस बैल अन् माणसाच्या लांब कोटाच्या मोठ्या थोरल्या

खिशांत वाटाडी खार डोकें हळूच वर काढून हुशारीनें बसलेली, अशा थाटांत ही अपूर्व मोहीम लौकरच एका गुहेच्या आवारांत येऊन पोंचली. गुहेंत अंधार होता. ती फार मोठी असून आंत फार खोल होती. अगदीं आंतल्या दालनांत झोंपेंतून नुकताच उठलेला सिंह जांभया देत होता व त्याचा परम मित्र व पंतप्रधान वाघोबा जवळच अजून निद्रा-सुख अनुभवीत आरामशीर पडला होता. सिंहानें वाघास ' ऊठ आतां! रात्र झाली, शिकारीस जायची वेळ झाली.' असें म्हणत दोनतीनदां हल-विलें. पण वाघोबाची झोंप फारच अवघड ! सिंह उठून उभा राहिला व आलोखेपिलोखे देऊं लागला. इतक्यांत हत्तीची हूंफ् हूंफ् अशी मोठी थोरली आरोळी याच्या कानांवर आली. क्षणभर वनराज दच-कला! हत्तीच्या मागोमाग घोडा, रेडा, बैल या सर्व प्राण्यांनीं आपापले आवाज मोठ्यानें काढून गुहेचें आवार दणाणून सोडलें. माणसानेंही तिरकमठ्याच्या टणत्कारानें व आपल्या अलहुरच्या ललकारीनें त्यांत इष्ट भर घातली.

हा काय प्रकार आहे असें आश्चर्य करीत सिह जो बाहेर येऊन पहातो तों त्याला हें विलक्षण दृश्य दिसलें. क्षणभर तो हतबुद्धच झाला. पण दुसऱ्याच क्षणीं त्यानें धांवत जाऊन हत्तीवर समोरून उडी मारली. हत्ती तयारींत होताच. त्यानें आपल्या सोंडेचा एक जोराचा फटकारा त्याला लगावला. सिंह खालीं पडला. परत त्यानें उडी मारिली. पण या वेळीं मात्र माणसानें त्याची गय केली नाहीं. अचूक नेम धरून त्यानें जो एक बाण सोडला तो नेमका सिंहाच्या पोटांतून आरपार बाहेर निघाला अन् सिंह धाडकन् खालीं कोसळला.

इतक्यांत बाहेरच्या गडबडीनें जागे झालेले वाघोबा गुहे बाहेर आले. पहातात तों आपले राजेसाहेब धरणीवर आंग टाकून निपचित पडलेले! त्याला चेव आला. तो प्रथम रेड्यावर धांवून गेला. रेड्याला त्यानें बरेंच घायाळ केलें. पण रेड्यानें देखील आपलीं अणकुचीदार शिंगें वाघाच्या पोटांत खुपसून त्याला जखमी केलें. तशा स्थितींतच वाघ बैलावर तुटून पडला. पण हत्तीनें चपळाई करून आपल्या सोंडेचा असा एक फटकारा त्याला लगावला कीं वाघ क्षणभर दगडा सारखा निपचित पडला. सगळ्यांना वाटलें, वाघोबानें पण 'राम' म्हटलें. पण खार हळूच म्हणाली, "तो मरायचा नाहीं बेटा एवढ्यानें. ढोंग करतो आहे मेला! सावध रहा, सर्व वीर हो, सावध रहा!" आणि खरोखरच दुसऱ्याच क्षणीं वाघ जो ताडकन् उठला तो तीरासारखा उडी मारून मागील बाजूनें हत्तीच्या पाठीवर चढला आणि त्याच्या पाठीवर बसलेल्या माणसावर आतां तो झेंप टाकणार, इतक्यांत माणसानें मागें वळून चपळाईनें आपला भाला नेम धरून त्याच्या उघडलेल्या अक्राळविक्राळ जबड्यांत जोरानें फेंकला. तो इमानी भाला त्या भयंकर प्राण्याचा जबडा फोडून त्याच्या गलेलठ्ठ मानेंतून बाहेर डोकावूं लागला आणि वाघाचें भलें मोठें धूड धाडकन् मागच्या मागेंच जमिनीवर कोसळलें!

झालें. हिंस्रांचा पुरा पराभव झाला. वानस्पत्यांचा पूर्ण विजय झाला. अरण्यांतील इतर श्वापदें शेंकड्यांनीं ही अपूर्व लढाई पहाण्यास जमलीं होतीं. पण वाघ सिंह पडलेले पाहून त्यांच्यांतल्या हिंसावादी पशूंनीं जो पोबारा केला तो जवळ जवळ कायमचाच. अन् मग त्या अरण्यांत फिरून गजराज्य सुरू झालें. खारीचा गजराजानें फार सत्कार केला व तिला प्रधान मंडळांत जागा दिली. शाकभक्षक प्राणी पुनः सुखानें राहूं

लागले. त्यांची संख्या पूर्वीप्रमाणें फुगत चालली अन् थोड्याच वर्षांत ती इतकी मोठी झाली कीं, माणसानें आपल्यावर फार उपकार केले आहेत, तेव्हां त्याच्या कायम मदतीस कांहीं प्राण्यांनीं जावें, असें गजराजानें ठरविलें.

माणसाला या गजराजाच्या खुषीच्या देणगीनें आनंद झाला. अन् त्यापुढें बरींच वर्षें माणूस व गजराज्यांतील पशु यांत सलोखा टिकला.

पण पुढें पुढें मात्र माणसाची बुद्धि चळूं लागली व तो करारनाम्याला धाब्यावर बसवून खुशाल गजराज्यांत शिकार करूं लागला. एकंदरींत शंकेखोर उंटाचें भविष्य खरें ठरलें म्हणायचें! माणसाच्या कृतघ्न बुद्धीमुळें गजराज्य मोडकळीस आलें व त्या अरण्यांत फिरून जो तो प्राणी हिंस्र श्वापदांच्या व माणसांच्या भीतीनें काळ कंठूं लागला. इकडे माणसांच्या वस्तींत जे प्राणी पाठविले गेले त्यांच्या नशिबीं तरी सुख होतें काय? एका हत्तीखेरीज करून बाकीच्यांच्या नशिबीं त्रास, कष्ट व पुरती गुलामगिरी अशी होती. खुद्द हत्तीलासुद्धां मोकळीक मुळींच नव्हती आणि वर अंकुशाचा मार त्याला खावा लागे!

अशा रीतीनें उंटाचें भविष्य खरें ठरलें. अन् या त्याच्या दूरदर्शी-पणामुळेंच कीं काय, चलाख माणसानें त्याच्या आयुष्याचें 'सहारा' केलें! बिचारा उंट, पण तो तरी काय करणार? 'आलीया भोगासी असावें सादर' असें म्हणत आयुष्य कंठीत असतो. त्यांतल्या त्यांत त्याला समाधान एवढेंच कीं माणूस आपल्या चातुर्यानें आपल्या अहिंस्र जातीचे कट्टे दुष्मन् जे वाघ, सिंह, अस्वल वगैरे त्यांना देखील पाळीव कुत्र्यामांजरांप्रमाणें सरकशींत रिंगण धरून उलट्या सुलट्या कोलांट्या मारण्याचीं हलकीं कामें करायला लावतो.

—***०***—

## ५. काळू राणी

एक होती लहानशी मुलगी. तिच्या आईबापांनीं तिचें मोठ्या आवडीनें कुसुम असें नांव ठेविलें. परंतु तिचा रंग अगदीं काळा होता आणि रूपहि अगदींच बेडौल होतें. त्यांतच तिला अगदीं लहानपणीं देवी आल्यामुळें तिच्या सर्व अंगावर व तोंडावर देवीचे मोठमोठे वण होते. त्यामुळें सर्वजण तिला काळू काळू म्हणूं लागले. तिला त्याचा फार राग येई. पण करते काय बिचारी ! सगळीं तिला हंसत. मुलें तर तिला वेडावत व चेष्टा करून त्रास देत. तिला आधीं कोणी आपल्यांत खेळायला देखील घेत नसत आणि घेतल्यास तिला हिडिस् फिडिस् करून 'नको जीव' करीत. मग ती बिचारी रडत रडत आईकडे यायची अन् मग आईनें तिची समजूत काढावी, किंवा तिच्या बाबांनीं तिला खाऊ देऊन उगी करावें. पण सारा दिवस तें लेकरूं घरांत तरी किती बसून राहणार ? पुन्हां ती मुलांत खेळायला जायची अन् फिरून तिची कोणी तरी खोडी केली कीं ती फिरून रडत घरांत यायची.

एक दिवस काळूला मुलांनीं भारीच भंडावून सोडलें आणि तिनें तावातावानें जाऊन त्यांच्या वडील माणसांकडे तक्रार केली तरी तीहि तिला फिदी फिदी हंसूं लागलीं; मग आपल्या खोडकर मुलांना रागें भरणें तर दूरच राहिलें ! तेव्हां तिला या लोकांची फार चीड आली. रागाच्या भरांत घरीं न येतां ती झपाझप पावलें टाकीत गांवाबाहेर आली. आपण कुठें जात आहों याचें तिला भानच राहिलें नाहीं. ती आपली सारखी वाट फुटेल तिकडे चालली होती. संध्याकाळला अजून थोडा अवकाश

होता. गुराखी जेथें गाई चारीत होते त्या जंगलांत ती येऊन पोंचली. आणि चालून चालून दमल्यामुळें तेथेंच ती एका झाडाखालीं बसली. संध्याकाळ झाली तरी ती तेथून उठण्याचें कांहीं चिन्ह दिसेना. ती बसली होती, ती जागा अगदीं एका बाजूला असल्यामुळें तिच्याकडे कोणाचें लक्षहि जाण्यासारखें नव्हतें. आतां अंधार चांगलाच पडला होता, तरी काळू बसल्या जागेवरून मुळींच हालली नाहीं. तिला भूक लागली होती. पण रागापुढें भुकेला कोण विचारतो ?

रात्र पडूं लागली तसा रान किड्यांचा किर्र्र् असा आवाज जोरानें ऐकूं येऊं लागला. काळूला आतां थोडी भीति वाटूं लागली. म्हणून ती त्या झाडावर चढून बसली आणि भुकेनें व श्रमानें लौकरच तिथेंच तिचा डोळा लागला. रात्रीचे बारा वाजले असतील. काळूला कोणीतरी हलवून झोंपेतून जागें केलें. ती दचकून उठली आणि डोळे चोळत चोळत पाहूं लागली. पहिल्यांदां तिला वाटलें चोर आला. पण तो चोर नव्हता, तो एक यक्ष होता. त्याचें घर त्या झाडावरच होतें. रात्रीं घरीं येतांच त्याला काळू दिसली. बिचारी पोर ! कोणाची बरे असेल ? यक्ष फार दयाळू होता. त्यानें तिला जागें केलें.

यक्ष काळूला म्हणाला, " बाळ, भिऊं नको. तूं कोण अन् इथं कां आलीस जंगलांत ?" काळू म्हणाली, " महाराज, मी एक जगानें टाकलेली कुरूप मुलगी आहे. माझे आईबाप माझ्यावर फार ममता करतात. पण सगळे लोक मला हिडिस् फिडिस् करतात. मला जगाचा वीट आला. तेव्हां इथं आलें रानांत. आपण मला झिडकारणार नाहीं ना ?"

यक्ष तिचें सरळ बोलणें ऐकून फार खूश झाला. ती त्याला भारी आवडली. तो तिला म्हणाला, " काळू, जग हें असेंच आहे. तरी

पण मी जगाला तुझ्या हातून एक चांगला धडा शिकवितों. जगानें तुला आज टाकलें आहे ना? ठीक. हेंच जग तुला उद्यां डोक्यावर घेऊन नाचेल! हें घे एक जादूचें फूल. हें तूं आपल्या डोक्यांत घातलेंस म्हणजे तूं एक अत्यंत सुंदर मुलगी होशील. फूल काढलेंस कीं परत पहिल्यासारखी होशील. तुला वाटेल त्या वेळीं फूल वापर. नको असेल तेव्हां काढून ठेव. हें फूल कधींच कोमेजणार नाहीं. झालें. चल आतां आपल्या घरीं. मी तुला तेथें एका क्षणांत पोंचवतों." असें म्हणून त्या दयाळू यक्षानें तिला कडेवर घेतलें आणि तिच्या घरीं जिथें तिची आई झोंपली होती त्याच अंथरुणावर तिला झोंपविलें व तो स्वतः तेथून एकदम अदृश्य झाला.

काळू कुठें नाहींशी झाली म्हणून तिला तिच्या आईबापांनीं पुष्कळ शोधलें परंतु ती त्यांना कोठेंच सांपडली नाहीं. बिचारे आईबाप त्या रात्रीं जेवले नाहींत व काळूचा विचार करीत अंथरुणावर पडून होते. पण एक वाजण्याच्या सुमारास त्यांचा जरा डोळा लागला. थोड्या वेळानें ते जागे होऊन पहातात तों काळू अंथरूणावर झोंपलेली आहे असें त्यांस आढळून आलें. त्यांना अत्यंत आनंद झाला व त्यांनीं देवाचे मनांत फार आभार मानले. काळूला झोंप लागली होती म्हणून त्यांनीं तिला उठविलें नाहीं. पण काळू इतका वेळ होती कुठें नी दार बंद असतांना ती घरांत कशी आली हें कोडें कांहीं त्यांना उलगडतां येईना!

दुसरें दिवशीं सकाळीं काळू उठल्यावर तिच्या आईबापांनीं तिला पुष्कळ विचारलें परंतु ती आपली गप्पच! कांहींच बोलली नाहीं. तेहि मग गप्प बसले. काळूनें तें जादूचें फूल आपल्या पेटींत अगदीं तळाशीं जपून ठेवलें. त्या फुलाविषयीं कोणालाही अगदीं दाद लागूं दिली नाहीं,

मात्र एक दिवस तिचे आईबाप बाहेर गेले असतां घरांत कोणी नाहीं असें पाहून दारें खिडक्या लावून तिनें तें फूल काढून डोक्यांत घालून पाहिलें. तेव्हां ती तत्क्षणींच इतकी सुंदर झाली कीं एखाद्या राजकन्येनें-देखील तिच्या रूपाचा हेवा करावा ! या गोष्टीस चार पांच वर्षें लोटलीं आणि आतां काळू थोडी मोठी झाली.

तिच्या लग्नाकरितां तिच्या वडिलांनीं पुष्कळ खटपट केली. पण जिथें जिथें तिला दाखवावी तिथें तिथें तिला सर्वांनीं नापसंत करावें. काळूला आतां त्याचें कांहींच वाटत नव्हतें. तिला आपणांस जितके अधिक लोक नापसंत करतील तितकें हवेंच होतें. आपलें दैव आपल्या हातीं आहे हा तिला आत्मविश्वास होता. आणि त्या यक्षाच्या कृपेनें मिळालेल्या अमूल्य देणगीचा उपयोग कसा व केव्हां करावा कीं जेणें करून आपणांस आपल्या रूपावरून झिडकारणारीं माणसें आपल्या पायांवर लोळण घ्यावयास पुढें सरसावतील, याचा ती सारखा विचार करी. काळू कुरूप होती पण फार बुद्धिमान् होती. तिनें आपल्या मनाशीं अनेक बेत रचले होते, पण त्यांची वाच्यता तिनें कोठेंच केली नाहीं. आपल्या आईबापांना सुद्धां तिनें आपल्या अद्भुत देणगीची अद्याप दाद लागूं दिली नव्हती.

आज काळूचा वाढदिवस ! तिला आज चौदावें संपून पंधरावें वर्ष लागलें होतें. काळूच्या प्रेमळ आईनें तिला सकाळींच नीट न्हाऊं घातलें, जे गरीबीचें दोन दागिने होते ते तिच्या अंगावर घातले आणि तिला एक चांगलें ठेवणींतलें लुगडें नेसावयास दिलें. काळू आईला म्हणाली, “ आई, आज मी देवीच्या देवळांत जाऊन पूजा करीन बरं का ? मला पूजेचं करून देशील ना ? ”



युवराज पुजाऱ्यावर एकदम ओरडून म्हणाले, "मूर्खा, लाज नाही वाटत ...

आईनें तिला पूजेचें तबक तयार करून दिलें. काळूनें कोणाकडून तरी असें ऐकलें होतें कीं, देवळांत अमक्या अमक्या वेळीं युवराजांची स्वारी देवीच्या दर्शनास यावयाची आहे. ती त्याच वेळेच्या सुमारास देवळांत गेली. तिनें जातांना आपल्या बरोबर तें जादूचें फूल नेलें होतें. देवीच्या गाभाऱ्यांत जाऊन काळूनें देवीची पूजा केली आणि तेथेंच थोडावेळ त्यान्हीं बसून राहिली. पण एक पुजारी बाहेरूनच तिच्या अंगावर ओरडला, "ए बये, नीघ ना बाहेर लौकर, युवराज आज पूजेला यायचे आहेत!" काळूनें तें ऐकलें न ऐकलेसें केलें आणि ती तेथेंच बसून राहिली. तितक्यांत युवराज देवळांत आले. सगळे पुजारी रांगेनें त्यांना खडी तालीम देण्यासाठीं उभे राहिले. तेवढ्यांत एक लठ्ठ पुजारी देवीच्या गाभाऱ्यांत धांवतच गेला आणि काळूच्या दंडाला धरून तिला बाहेर खेचून काढूं लागला. गाभाऱ्यांत बराच अंधार असून एक मिण-मिण समई देवीच्या तोंडावर उजेड पाडण्याचा यत्न करीत होती. काळूनें चटकन् आपलें जादूचें फूल डोक्यांत घातलें. त्याबरोबर तिचें रूप एकदम पालटलें. पण पुजारी आपल्याच तोऱ्यांत होता. तो तिला आपल्या मागून ओढीतच होता. काळूला त्यानें गाभाऱ्या बाहेर दंडाला धरून खेंचीतच आणलें. सर्वजण पहातात तों ती कुरूप काळू नसून एक अतिशय सुंदर अशी मुलगी आहे आणि तिला तो आडदांड पुजारी जोरजोरानें खेंचीत आहे.

युवराजांना तें दृश्य पाहून त्या पुजाऱ्याचा मनस्वी राग आला. ते त्याच्यावर एकदम ओरडून म्हणाले, "मूर्खा, लाज नाहीं वाटत थोर-मोठ्यांच्या मुलीचा दंड पकडायला? शिपायांनो, याला पकडा व कैदेंत टाका. स्त्रियांवर हात टाकणाऱ्या या भेकडाचा हात कलमच केला पाहिजे."

इतकें बोलून युवराजांनीं त्या सुंदरीपुढें (म्हणजे आपल्या काळूपुढें) थोडेंसें लवून तिला दरबारी थाटाचा मुजरा केला व म्हटलें, "बाई, तुम्हांला त्या अडदांडाकडून त्रास झाला याबद्दल मला फार वाईट वाटतें. माझे शिपाई मी तुमच्या बरोबर देतों ते तुम्हांला माझ्या रथांतून तुमच्या घरीं सुखरूप पोंचवतील." काळूनेंही योग्य शब्दांत युवराजाचे आभार मानले व त्याच्याकडे सस्मित वदनानें पहात पहात ती युवराजाच्या रथांत बसून आपल्या घरीं आली. काळूनें युवराजाचें हृदय प्रथम दर्शनींच काबीज केलें. असो.

इकडे काळूच्या घरापुढें राजवाड्यांतला रथ व लवाजमा पाहून सर्व लोकांना फारच नवल वाटलें. आणि रथांतून एक चौदा पंधरा वर्षांची सुंदर मुलगी उतरून काळूचे घरांत शिरतांना पाहून तर त्यांना आश्चर्याचा धक्काच बसला. ही बाई कोण व हिचें येथें काय काम? यांचा कुणासच उलगडा होईना! थोडया वेळानें युवराजाचा रथ व लवाजमा निघून गेला.

काळूनें घरांत येतांच फूल काढून हातांत घेतलें व मग तिनें आश्चर्यानें स्तंभित झालेल्या आपल्या आईबापांस सारी हकीकत सांगितली. त्यांना तिची रानांतील हकीकत ऐकून व तिला यक्षानें दिलेली ती अद्भुत देणगी पाहून अतोनात आश्चर्य वाटलें. आपल्या मुलीला आतां कुठें ठेवूं नी कुठें न ठेवूं असें त्यांना होऊन गेलें. मात्र काळूच्या सांगण्यावरून त्यांनीं काळूच्या जादूच्या फुलाचें रहस्य कोणासहि सांगितलें नाहीं.

आतां काळू पूर्वींच्या सारखीच घरांत वावरे. तिनें फूल काढून जपून ठेविलें होतें. लोक विचारीत, "युवराजाचा रथ तुमचे दारीं का

आला होता, अन् ती सुंदर मुलगी कोण होती ? " पण काळू व तिचे आईबाप त्यावर कांहीं तरी उडवाउडवीचीं उत्तरें देत व त्यांना गप्प करीत.

काळूला त्या दिवशीं देवळांत पाहिल्यापासून युवराजाचें मन फार बेचैन झालें. त्याचें कशांतच लक्ष लागेना. त्याची ती विचित्र अवस्था पाहून राजानें त्यास खोदून खोदून विचारलें तेव्हां तो वडिलांस म्हणाला, " महाराज, मला एका शहरांतील मुलीशीं लग्न करावयाचें आहे. राजानें विचारलें, " कोण ही मुलगी ? " युवराज म्हणाला, " इथेंच आहे. पण तिचें नांव मला माहीत नाहीं. तिचें घर मात्र माझ्या नोकरांस माहीत आहे. "

राजानें लगेच दिवाणजींस बोलावून मुलगी कोण, कुणाची, कशी काय आहे तें सगळें पाहून या असें त्यांस सांगितलें. दिवाणजी आले त्यावेळीं काळू आपल्या सैंपाक घरांत काम करीत होती. राजाकडून कोणी तरी आलें आहे हें कळतांच तिनें नीटनेटका पोषाक केला, तें जादूचें फूल डोक्यांत घातलें आणि मग ती वडिलांबरोबर दिवाणजींसमोर येऊन विनयानें उभी राहिली. दिवाणजी तिचें तें स्वर्गीय सौंदर्य पाहून थक्कच झाले. ते तिच्याशीं थोडेसें बोलले त्यावरून तिची बुद्धिहि किती तीव्र आहे हें त्यांना कळून आलें. मग दिवाणजी काळूचे वडिलांचा निरोप घेऊन रथांतून राजवाड्यांत परत आले व त्यांनीं राजेसाहेबांस सर्व हकीकत निवेदन केली. राजेसाहेब म्हणाले, " युवराज, पाहिलंस ? मुलगी सुंदर आहे. कुलशील चांगलें आहे. बुद्धिमान् पण आहे. पण ती एका गरीब कुटुंबांतली आहे."

त्यावर युवराज म्हणाला, " बाबा, असेना गरीब. मला मुलीशीं लग्न करायचें आहे, तिच्या धनाशीं नव्हे ना ? आपल्यापाशीं काय थोडें

वैभव आहे म्हणून मुलीच्या पैशाचा आपण लोभ धरावा ?" राजा यावर निरुत्तर झाला. शेवटीं त्यानें लग्नाला कबूली दिली. आणि त्याप्रमाणें काळूच्या वडिलापाशीं युवराजाकरतां काळूला मागणी घालण्यासाठीं दिवाणजी काळूचे घरीं आले. काळूच्या आई-वडिलांस अतिशय आनंद झाला. पण काळू एकीकडे वडिलांस म्हणाली, " बाबा, दिवाणजींना कळवा कीं, काळूला स्वयंवर करावयाचें आहे. लग्न नव्हे." बाप पोरीच्या या विलक्षण उत्तरानें स्तंभितच झाला. पण मुलीच्या शहाणपणाबद्दल त्यांना पुरता विश्वास होता. त्यांनीं त्याप्रमाणें दिवाणजीस उत्तर सांगितलें. दिवाणजी काय करणार विचारे! त्यांना तो निरोप राजवाड्यांत पोंचविण्यावांचून गत्यंतरच नव्हतें. तो ऐकून मात्र राजा व युवराज यांना फार नवल वाटलें आणि थोडा राग पण आला. पण उपाय काय ? राजाला वाटलें, बरें झालें, सुटीवाचून खोकला गेला. पण युवराजाला मात्र काळू आतां जास्तच आवडूं लागली. करीन तर हिच्याशींच लग्न करीन असा जणूं त्यानें मनांत निश्चयच केला.

पुढें कांहीं दिवसांनीं काळूच्या सांगण्यावरून काळूसह तिचे आईबाप एक दिवस नगर गुपचुपपणें सोडून लांब खूप लांब असलेल्या एका दुसऱ्या मोठ्या शहरांत जाऊन राहिले. येथचें राज्य वेगळें होतें. येथें त्यांना कोणी ओळखीत नसल्यामुळें काळूनें तें जादूचें फूल नेहमींच वापरावयास काढलें आणि अशा रीतीनें प्रथमपासूनच ती त्या नगरांत एक अत्यंत सुंदर मुलगी म्हणून आपल्या आईबापांबरोबर राहूं लागली. तिनें आतां आपलें नांव बदलून 'उर्वशी' असें नांव धारण केलें. या दुसऱ्या शहरांतहि तिच्या देखणेपणाचा खूप बोलबाला झाला आणि हळू हळू ती गोष्ट येथल्याहि राजाच्या व युवराजाच्या कानापर्यंत गेली.

क्रमाक्रमानें काळूचें सुंदर रूप अनेक देशच्या राजेरजवाड्यांना कर्णोपकर्णी कळून आलें व जो तो तिला वरण्यासाठीं उत्सुक झाला.

काळूनें एक दिवस आपलें स्वयंवर जाहीर केलें. काळूचा बाप गरीब होता. पण त्यानें एका लोभी व धोरणी सावकाराकडून खप मोटी रक्कम कर्जाऊ घेतली व उर्वशीच्या ( म्हणजे काळूच्या ) लग्नानंतर तुझें सर्व कर्ज दामदुपटीनें फेडून टाकीन असें त्यानें सावकारास शपथेवर सांगितलें. सावकार धूर्त होता. त्यानें पाहिलें कीं उर्वशीला कोणी तरी बडा राजामहाराजा वरल्यावांचून राहात नाहीं. आपले पैसे दामदुपटीनें वसूल होतील. तेव्हां त्यानें लागेल तितका पैसा काळूच्या बापास पुरविण्याचें कबूल केलें.

स्वयंवर जिकडे तिकडे जाहीर करण्यांत आलें. स्वयंवराचा मंडप अतिशय भव्य व सुंदर उभारण्यांत आला. ज्याच्या त्याच्या तोंडीं ‘उर्वशीचें स्वयंवर’ हा विषय होता. स्वयंवरासाठीं त्या शहरांत दूरदूरचे राजे, महाराजे, युवराज आणि मोटमोठे सरदार व इनामदार ऐटबाज पोषाख व उंची उंची अलंकार घालून आले होते. “ ही सुंदरी आपल्याला वरील काय ? ” अशी प्रत्येकाला हुरहुर लागून राहिली होती. या एकंदर पाहुणे मंडळींत काळूच्या पहिल्या नगराचा युवराजहि स्वयंवरासाठीं आलेला होता.

सर्व राजे, लोक वगैरे आपआपल्या आसनांवर बसल्यानंतर हातांत फुलांचा एक सुंदर हार घेऊन काळू मंडपांत आली. जो तो मनांत मांडे खाऊं लागला कीं आतां ही अप्सरा मलाच माळ घालणार ! काळू हळू हळू पावलें टाकीत एकेका समोरून चालत होती. अनेक राजे युव-

राजांना निराश करून ती थोडी पुढें गेली. तोंच मागले कांहीं युवराज रागानें उठले व म्यानांतून तरवारी काढून “ या, आमच्याशीं लढा नाहींतर आम्ही या सुंदरीला पळवणार ! ” असें ओरडून म्हणाले. झालें. सभामंडपांत एकच दंगल माजून राहिली. जो तो दुसऱ्याशीं आवेशानें लढूं लागला. रक्ताचे पाट वाहूं लागले. किती तरी जखमी होऊन पडले. सुदैवानें कोणी मेलें नाहीं एवढेंच. काळू या अकल्पित प्रकारानें क्षणभर दिङ्मूढ झाली. पण लगेच प्रसंगावधान राखून ती एका उंच व्यासपीठावर चढली व ओरडून म्हणाली, “ थांबा, हा रक्तपात एकदम थांबवा. तुम्हांला शपथ आहे माझ्या गळ्याची ! आणि जर कां तुम्हीं ही लढाई ताबडतोब थांबविली नाहीं तर मी या कट्यारीनें आतांच तुमच्या देखत स्वतःचा प्राण घेतें. ” हें ती इतक्या आवेशानें बोलली कीं सर्वांच्या तरवारी खाडकन म्यानांत घुसल्या आणि क्षणार्धांत सर्वत्र सामसूम झालें ! काळू पुढें म्हणाली, “ राजेलोकहो, बस्स झाला हा स्वयंवराचा खेळखंडोबा ! आतां आपण सर्वजण आपआपल्या देशीं जा आणि आठ दिवसांच्या आंत ज्याला मी प्रेम पत्रिका पाठवीन तोच माझा पति असें समजा. आमच्या उभयतांच्या मंगल विवाहकार्याला आपण सर्वजण जरूर या. क्षमा करा मला झाल्या प्रकाराबद्दल. ” असें बोलून काळू खालीं उतरून जखमी झालेल्या राजपुत्रांच्या जखमा स्वतःच्या हातांनीं अतिशय हळुवारपणें बांधूं लागली. त्यामुळें ज्यांना जखमा झाल्या नव्हत्या त्यांना जखमी लोकांचा साहजिकच हेवा वाटला ! असो.

या जखमा बांधण्याच्या कामांत काळूला एक उमदा राजपुत्र मदत करीत होता. बालवाचक, तो दुसरा तिसरा कोणी नसून आपल्या

काळूच्या पहिल्या शहरचा तिला देवळांत भेटलेला युवराजच होता. त्यानें मात्र आपल्या म्यानांतून तरवार मुळींच काढली नव्हती. उलट जखमी होऊन पडलेल्या राजपुत्रांची तो आस्थेनें शुश्रूषा करीत होता. काळूनें हें सर्व पाहिलें होतें. त्यामुळें तिला तो युवराज पूर्वींहूनहि जास्तच आवडूं लागला.

झालें. स्वयंवर मोडलें. सर्व राजेरजवाडे, सरदार, इनामदार देशोदेशीं निघून गेले. पण प्रत्येकास अजूनहि आशा वाटत होती कीं उर्वशीची प्रेमपत्रिका आपणांसच येणार! म्हणून जो तो तिच्या प्रेमपत्रिकेची उत्कंठेनें वाट पहात होता.

बरोबर आठव्या दिवशीं काळूची प्रेमपत्रिका तिच्या पूर्व परिचयाच्या युवराजाचे हातीं आली. ती वाचून त्याला स्वर्ग दोन बोटें उरल्यासारखें झालें. तो लगेच आपल्या बापाकडे गेला व त्यास ती गोष्ट कळवून 'आतां विवाहाचा मुहूर्त ठरवा' असें म्हणाला. राजानें तें आनंदानें कबूल केलें. विवाहाची सर्व तयारी झाली. विवाह थाटानें पार पडला. बहुतेक राजे युवराजे विवाहाला मोठ्या आनंदानें हजर राहिले व त्यांनीं त्या सुंदर, शूर व चतुर वधूस अनेक प्रकारचे उत्तम उत्तम नजराणे अर्पण केले.

युवराज व काळू आतां आनंदांत राहूं लागलीं. काळूच्या आईबापांचा आनंद तर गगनांत मावेना!

पुढें कांहीं वर्षांनीं राजा म्हातारपणामुळें वारला व युवराज त्याच्या सिंहासनावर आरूढ झाला.

आतां काळू राणी झाली. तिच्या पतीचें तिच्यावरील प्रेम दिवसें दिवस वाढतच होतें. काळू राणी झाल्यापासून तिनें आपल्या पतीकरवीं

राज्यांत अनेक सुधारणा घडवून आणल्या. त्यामुळें प्रजा अतिशय सुखी होऊन ती राणीला दुवा देऊं लागली. एवढेंच नव्हे, पण ती इतकी दयाळू, प्रजाहितदक्ष व दानशूर होती कीं सर्व लोक तिला ही एक स्वर्गीय देवता आहे असें मानूं लागले.

एक दिवस राजाराणी महालांत आनंदानें गप्पागोष्टी करीत असतां राणी राजास म्हणाली, " नाथ, तुमचें मजवर प्रेम आहे काय ?"

राजा म्हणाला, " हें काय भलतंच विचारतेस, ऊर्वशी ? खरोखर तुला शंका का वाटते ?"

काळू म्हणाली, " महाराज, शंका नाहीं. पण तुमचें प्रेम मजवर, माझ्या देहावर कीं आत्म्यावर ?" हा अकल्पित प्रश्न ऐकून राजा थोडासा बुचकळ्यांत पडला. त्याला तावडतोब उत्तर सुचेना. जराशानें त्यानें उत्तर केलें, " प्रिये, तुझा प्रश्न थोडासा विचित्रच नाहीं का ? तरी पण मला वाटतं, माझं तुझ्या देहापेक्षां तुझ्या गुणांवर म्हणजेच आत्म्यावर जास्त प्रेम आहे."

राजा कांहीं खोटें बोलत नव्हता. तो खरोखरच एक सज्जन मनुष्य होता. तरी पण काळूला अजून त्याच्या प्रेमाची कसोटी पारखून पहायची होती. ती पुढें म्हणाली, " पण नाथ, असें समजा कीं उद्यां मी आजारी पडलें किंवा मला कांहीं अपघात घडला आणि माझें हें बाह्य सौंदर्य नष्ट झालें तर—" राजानें तिच्या तोंडावर हात ठेवला व " असें भलतें सलतें कां बरं बोलतेस ?" असें म्हणून तिला त्यानें प्रेमानें दटावलें.

" नाहीं, मी याचा आज छडा लावल्यावांचून राहणार नाहीं." असें म्हणून राणीनें खोटा आव आणून रुसण्याचें सोंग केलें व ती राजाकडे पाठ करून बसली..

" बरं बोवा; विचार तुला काय विचारायचं तें. मग तर झालं ? " राजा नाइलाजानें म्हणाला.

" मला आपण असं सांगा कीं मी आतां या क्षणीं अगदीं कुरूप झालें तरी मी तुम्हांला पूर्वी इतकी आवडेन का ? "

" कांहीं तरीच बोलतेस ! एकाद्याला कुरूप कसं बनतां येईल ? काय जादूबिदू आहे कीं काय तुझ्यापाशीं ? " राजानें हंसत हंसत विचारलें.

" होय, क्षणभर असंच समजा कीं माझ्याजवळ तशी कांहीं तरी जादू आहे. अन् मी आपलें रूप पालटूं शकतें. तर मग तुम्ही मला टाकून द्याल ना ? कदाचित् तुम्हांला आजपर्यंत फसवल्याबद्दल तुरुंगांत सुद्धां टाकाल, नाहींतर फांशीं सुद्धां द्याल ! "

" छे, छे, अशक्य. एक तर तूं मला फसवलं नाहींस. दुसरें असें कीं, तूं मला इतकी प्रिय आहेस कीं तूं म्हणतेस त्याप्रमाणें जर तूं कधीं काळीं कुरूप झालीस तर मी स्वेच्छेनें आंधळा होईन. म्हणजे तुझी रम्य मूर्ति माझ्या हृदयांत निरंतर कायम राहील. "

राणीनें हें ऐकून राजास दृढालिंगन दिलें व नंतर लगेच उठून तिनें त्याचे पाय घट्ट धरले व त्याजपाशीं अभयवचन मागितलें. राजाला राणीच्या या एकंदर वर्तणुकीचा अर्थच कळेना ! तरी पण त्यानें तिला मोठ्या आनंदानें अभयवचन देऊन वर उठविलें. काळूस आतांचा क्षण आपलें खरें रूप प्रकट करण्यास अत्यंत योग्य वाटला आणि तिनें हळू हळू राजास आपल्या लहानपणापासूनची एकंदर हकीकत निवेदन केली. राजास तिची अद्भुत हकीकत ऐकून अतिशय अचंबा वाटला आणि

काळूचा खरेपणा पाहून तर त्याचें तिजवरील प्रेम अमर्यादित वाढलें. तो म्हणाला, " प्रिये, तूं खरोखर मला एकादी शापभ्रष्ट देवता वाटतेस. तूं जरी मला तुझें हें रहस्य जन्मभर सांगितलें नसतेंस तरी तुझें कांहींहि वांकडें झालें नसतें. पण ज्याअर्थी तें मला सांगण्याचा हिय्या केलास, त्याअर्थी तुला सत्याची किती चाड आहे तें दिसून येतें. खरोखर तुझ्यासारखी पत्नी मला लाभली हें मी माझें मोठें भाग्य समजतों. "

" महाराज, आपण हें काय बोलतां ? आपल्यासारखे उदार व प्रेमळ आत्मे या भूतलावर शोधूं गेल्यास कितीसे सांपडतील ? आपणांस मी फसवीत आहें ही माझ्या मनाला क्षणोक्षणीं टोंचणी होती. म्हणून एकदां खरी गोष्ट तुम्हांला सांगून टाकावी, मग काय होईल तें होवो असा मनाचा धडा करून आज मी आपणांस माझें रहस्य उघडें करून दाखविलें. आपण उदारपणानें मला अभय दिलें व क्षमा केली आणि आपलें मजवरील प्रेम हिणकस नसून अतिशय उच्च प्रकारचें आहे, हें सिद्ध केलें. म्हणजे मीच खरोखर या जगांत खरी भाग्यवान्. माझ्या भाग्याचा आणि सुखाचा स्वर्गांतील देवतांना सुद्धां हेवा वाटेल. " राजा या तिच्या भाषणानें फारच संतुष्ट झाला व तिला त्यानें आपल्या बाहुपाशांत घेतलें. तसें करतांना तिच्या डोक्यांतील तें जादूचें फूल आपण होऊन त्यानें काढून हातांत घेतलें, आणि तरीहि तत्क्षणींच काळ्या व कुरूप झालेल्या आपल्या पत्नीला त्यानें थोडीशीहि दूर सारली नाहीं कीं आपलें आलिंगन शिथिल केलें नाहीं. अंमळशानें राजा म्हणाला, " प्रिय राणी, नुसतें शरीर सुंदर असण्यापेक्षां हृदय-आत्मा-सुंदर असणें कितीतरी चांगलें आहे, तें तूं मला आपल्या उदाहरणानें चांगलें पट-

विलेंस. कारण देहाचें सौंदर्य आज आहे नी उद्यां नाहीं. पण हृदयाचें सौंदर्य चिरकाल टिकणारें आहे. मनुष्य मेल्यावरहि तें कीर्तीच्या रूपानें जगांत अमर होतें."

पण काळू या ऐश्वर्यामुळें गर्वानें कधींच फुगली नाहीं. उलट आपल्या पूर्वस्थितीचें स्मृतिचिन्ह म्हणून तिनें राजाच्या संमतीनें आपणांस सर्वांनीं 'काळूराणी' म्हणूनच म्हणावें अशी जाहीर घोषणा करविली. मुलांनो, पाहिलंत ! साधारणपणें आपणा सर्वांना गोंडस नांवाचा आणि पदव्यांचा किती हव्यास ! पण आपली कथानायिका तर राणीपदाला पोंचून देखील स्वतःस 'काळू' म्हणवून घेण्यांत भूषण मानी. असो.

आतां काळू यक्षानें दिलेल्या फुगाचा क्वचितच उपयोग करी. तरी देखील तिच्यावरील राजाचें प्रेम रतिभरही ओसरलें नाहीं कीं प्रजेचा तिच्याविषयींचा आदर थोडाहि कमी झाला नाहीं. काळूच्या लहानपणीं जे लोक तिला तिच्या रंगरूपाबद्दल हिणवीत तेच आतां तिला एकाद्या पूज्य देवतेप्रमाणें मानून तिच्या पायांवर लोळण घेऊं लागले. यक्षाची भविष्यवाणी अशा रीतीनें खरी ठरली. लोकांना त्यानें आपल्या जादूच्या फुगाच्या द्वारां एक उत्कृष्ट धडा शिकविला !

बालवाचक, संपली आमची कथा. पण बालस्वभावानुसार काळू राणीचें पुढें काय झालें हें जाणण्याची उत्सुकता तुम्हांला वाटणें सहाजिक आहे. तेव्हां तो भाग थोडक्यांत सांगतों.

काळूची कर्तव्यनिष्ठा, पतिप्रेम व धर्मपरायणता पाहून ईश्वर अत्यंत संतुष्ट झाला यांत नवल नाहीं. एक दिवस अचानक त्यानें एका हिमालयांत राहाणाऱ्या मुनिमहात्म्याला तिच्या राजवाड्यांत जाण्याची

प्रेरणा केली. राजाराणींनीं या ज्ञानी महात्म्याची एकनिष्ठपणें कित्येक दिवस सेवा केली. त्यांच्या या नम्र व निर्हेतुक सेवेनें अत्यंत संतुष्ट होऊन त्यानें राणीला एक दिव्य वनस्पती दिली व सांगितलें कीं, हिचा रस काढून सर्वांगाला लाव म्हणजे तूं कायमची सुंदर होशील. इतकें बोलून तो महात्मा राजवाडा सोडून एकदम निघून गेला. काळूनें तर महात्म्याच्या सांगण्याप्रमाणें करतांच तिचा विलक्षण कायापालट झाला. राजा तर हा दिव्य चमत्कार पाहून आनंदानें नुसता नाचूं लागला. हां हां म्हणतां ही बातमी सर्व शहरभर पसरली आणि लोकांच्या झुंडीच्या झुंडी राणीच्या दर्शनाकरतां राजवाड्यावर लोटूं लागल्या. राज्यांत मोठा उत्सव साजरा करण्यांत आला. गरीबांस दानें वाटण्यांत आलीं. जिकडे तिकडे आनंदी आनंद झाला. पुढें काळूस पांच मुलगे व पांच मुली झाल्या. हीं सर्व मुलें एकाहून एक सुंदर होतीं. देव एकदां का प्रसन्न झाला म्हणजे मनुष्याच्या सुखाला पारावार राहात नाहीं ! हे सर्व मुलगे गुणवान् व पराक्रमी निघाले. त्यांनीं आपल्या बापाच्या राज्याचा खूपच विस्तार केला. "अनंत हस्तें कमलावरानें, देतां किती घेशिल दो करानें ?" हें वचन किती सार्थ आहे बरें !

राज्यकारभार थोरल्या मुलावर सोंपवून काळू व तिचा पति यांनीं वार्द्धक्यांत वानप्रस्थ आश्रम स्वीकारला व उरलेलें आयुष्य त्यांनीं ईश्वरभजनांत घालविलें.

मुलांनो, आतां सांगा पाहूं, रूप श्रेष्ठ कीं गुण ?

---

## ६. शेजारी

सदूभाऊ अन् राजाभाऊ या दोघांची मैत्री इतकी दाट, इतकी जीवश्च कंठश्च होती कीं, साऱ्या गांवांत त्या दोघांकडे बोट दाखवून लोक बोलत, "मैत्री असावी तर अशी असावी!" ते दोघे एका लहानशा चाळींत पहिल्या मजल्यावरील दोन शेजारीं शेजारीं असलेल्या गाळ्यांत रहात. दोघांनाहि कुठल्याशा हपिसांत नोकरी होती. दोघेही साधारण मध्यम स्थितींतले तरुण गृहस्थ होते. कोठेंहि जा, बाजारांत, सिनेमाला, गाण्याला किंवा सभेला, राजाभाऊबरोबर सदूभाऊ नाहींत असें कधीं व्हावयाचें नाहीं. भांडण हा शब्द त्या उभयतांच्या जणूं कोशांतच नव्हता. सारांश या उभयतांची जोडगोळी अशी अभेद्य होती. व या गोष्टीचें सर्वांस मोठें नवल व कौतुक वाटे.

परंतु म्हणतात ना कीं कोणतीही गोष्ट मग ती चांगली असो वा वाईट असो, तिला या नश्वर जगांत अंत म्हणून आहेच. आमच्या या दोघां मित्रांच्या अप्रतिम मैत्रीचें तसेंच झालें. आणि त्याला कारण किती क्षुल्लक होतें हें पाहिलें, म्हणजे मनुष्याच्या स्वभावधर्माचें कोडें खरोखर अतर्क्य आहे असें वाटूं लागतें!

माझ्या बालवाचकांनो, तुम्हांला मी सांगायला विसरलों कीं सदूभाऊंनीं एक मांजर पाळलें होतें. तें पिलूं असल्यापासून त्यांच्याकडे असल्यामुळें त्याचा त्यांना भारी लळा लागला होता. त्यांनीं तो बोका असल्यानें मोठ्या लाडिकपणें त्याचें नांव 'मनोहर' किंवा 'मन्या' असें ठेवलें होतें. मन्यावर सदूभाऊंचा भारी जीव. रात्रीं तो कुशींत नसला कीं, त्यांना झोंप यायची नाहीं. व दिवसा त्याला मांडीवर घेऊन मोठ्या प्रेमानें एकदोनदां कुरवाळल्याशिवाय त्यांना चैन पडायचे नाहीं.

मन्याकरतां पावशेर दुधाचा स्वतंत्र रतीब असे. अन् त्याशिवाय तो सदूभाऊंच्या पत्नीशीं गरम गरम तूपभात सांजसकाळ पोटभर खाई तो वेगळाच. असल्या या राजशाही खाण्यापिण्यामुळें मन्या इतका फुगला होता कीं, दुरून पहाणारास त्याच्या करड्या रंगाच्या पट्ट्यांमुळें तो एखाद्या वाघाच्या पिलासारखा भासे! असो. मन्या सदूभाऊचा अत्यंत लाडका म्हणून त्याचे परम मित्र राजाभाऊ यांनाही तो अतिशय प्यार होता हें सांगायला नकोच. बेट्या मन्याची त्यामुळें मोठी चंगळ उडत असे. दोन्ही घरांत खुशालचंदाप्रमाणें तो खाई, पीई अन् ताणून देई. त्यामुळें मन्या आपल्या मालकाच्या खालोखाल जर कोणाला अतिशय चाहत असेल तर राजाभाऊंनाच. आणि राजाभाऊ देखील मन्यावर फार खूष असत!

पण विधिघटना कांहीं निराळीच होती. राजाभाऊंचें नुकतेंच म्हणजे एक दोन महिन्यांपूर्वी लग्न झालें होतें. त्यांच्या बायकोला पहिल्यांदांच त्यांच्या घरीं रहाण्यासाठीं एक दिवस तिच्या वडिलांनीं आणून पोंचविलें. तिच्या बरोबरच्या सामानसुमानांत एक पितळी पिंजरा व त्यांत एक सुंदर पोपट पाहून क्षणभर राजाभाऊंना आपल्या बायकोच्या सदभिरुचीबद्दल अभिमान वाटला. पण दुसऱ्याच क्षणीं त्यांच्या मनांत एक निराळीच भीति उभी राहिली, आणि त्यांचें मन उगीच उदासवाणें झालें. त्यांनीं विचारलें, "हा कुणाचा पोपट?" "

"कुणाचा म्हणून काय विचारायचं? माझा. अगदीं लहान पिल्लं असल्यापासून तो मीं बाबांकडे असतांना पाळलेला आहे. पण माझ्याशिवाय तो नीट रहाणार नाहीं, म्हणून बाबा म्हणाले, 'वत्से, तूं त्याला

तुझ्या नव्या घरीं घेऊन जा कशी ! त्याला तुझ्यावांचून चैन पडायचें नाहीं.' म्हणून मग आणला त्याला माझ्या बरोबर. कां ? आपल्याला नाहीं का पोपट आवडत ? नसेल तर–"

"छे छे !" राजाभाऊ तिला मध्येंच अडवून म्हणाले, "मला आवडत नाहीं असं कधीं मी म्हटलं ? मला पोपट आवडतो. अन् तो तुझा म्हणून तर फारच आवडतो. पण–"

"पण काय गडे–नको ना तो आपल्याला ? तर मग बाबांना सांगतें तो परत घेऊन जायला–मग तर झालं ?" एवढें बोलून वत्सलाबाई बाहेर गॅलरींत आपल्या बाबांना हांक मारायला जाऊं लागल्या. पण राजाभाऊंनीं त्यांना दारांतच अडवून ठेवलें, व ते मोठ्या मिनतवारीनें त्यांची समजूत घालूं लागले.

"अग पण मी कुठें म्हणतोंय कीं त्याला बाबांकडे पोंचव म्हणून ? राहूं दे ना. मला भारी आवडेल तो. आतां तरी झाली राणी साहेबांची समजूत ?" "इश्श" म्हणून राजाभाऊंच्या राणीसाहेबांनीं मान वेळावली व राजाभाऊंकडे हंसतमुखानें पहात स्वयंपाक घरांत धूम ठोकली. राजाभाऊंना मनांत फार धन्यता वाटली. पत्नी आपल्या-मनासारखी मिळाल्याबद्दल त्यांचें मन क्षणभर स्वर्गीय आनंदांत मग्न झालें. छताच्या मधोमध असलेल्या वांकड्या खिळ्याला लावलेल्या पितळी पिंजऱ्याकडे त्यांचें लक्ष गेलें. पोपटानें त्यांना हटकलें, "विठूमिया, विठूमिया, नमस्कार. काय ? बरें आहे ना ?" पोपटाचें तें पढवलेलेंच पण समयोचित भाषण ऐकून राजाभाऊंना फार आनंद झाला. "तुझा पोपट मोठा गोड बोलतो कीं ग !" असें म्हणून त्यांनीं बायकोचें अभिनंदन केलें.

चहा व फराळ चालू असतां दोघांच्याही गप्पांना अगदीं रंग चढला. इतक्यांत म्याँव् म्यांव् करीत मन्याबांची स्वारी आंत आली. अन् राजा-भाऊंच्या मांडीवर जाऊन पुर्र्र् करीत घोरूं लागली. " अग बाई ! मांजर ! कोणाचें हें ?" असें म्हणून वत्सलाबाई ताडकन् उठल्या आणि पिंजऱ्याचें दार नीट बंद आहे कीं नाहीं तें पहायला बाहेरच्या खोलींत धांवतच गेल्या.

" अग, एवढं घाबरायला काय झालं ? मांजर माझ्या चांगलं संवयीचें आहे. तें तुझ्या पोपटाला कांहीं करणार नाहीं."

" हो, हो. म्हणे पोपटाला कांहीं करणार नाहीं. अहो, मांजर तें मांजर. तें का आपला देहस्वभाव टाकणार आहे तुमच्या संवयीचें असलं म्हणून ? मला तुमचं मांजर आहे, हें कळतं तर सोन्याला मी कधींच बाबांच्या घरून आणलं नसतं."

" मग आतां आणलंस म्हणून कुठं बिघडलें ? मांजर, कांहीं माझं नव्हे, माझ्या मित्राचें आहे. उगीच आपलं तें इथं येतं इतकंच माझ्या संवयीमुळें."

" तरी पण सोन्याला धोकाच आहे म्हणायचा नेहमीं. कारण तुम्हींच पहा. माझा सोन्या किनै सारखा पिंजऱ्यांत राहात नाहीं. रात्रींचा तेवढा काय तो पिंजऱ्यांत असतो. दिवसा त्याला पिंजऱ्यांत रहाण्याची बिलकूल संवय नाहीं. तो सारखा माझ्या अंगा-खांद्यावर असतो, नाहींतर पाठोपाठ घरांतल्या घरांत हिंडतो म्हणजे बेटा मोठ्या खुषींत असतो. पिंजऱ्यांत कोंडून ठेवला तर सारखा चुळबुळ करतो अन् सारखा रागांत असतो. खाणंपिणं सुद्धां करीत नाहीं दिवसां पिंजऱ्यांत."

"अरेच्या, बराच आहे कीं तर मग तुझा पोपट! तरी कांहीं हरकत नाहीं. आपण करूं त्याचा बंदोबस्त. या बेऱ्या मन्याला आजपासून आमच्या खोलींत पाऊल टाकण्याची बंदी. बस्स. मन्या—चले जाव यहाँसे–अन् पुन्हा इकडे आलास तर तंगडी मोडीन. याद राखून ऐस."

हे शब्द सदूभाऊंच्या कानावर पडले. ते नुकतेच बाहेरून जाऊन आले होते. अन् गॅलरींतून राजाभाऊंकडे येणार तों वरील शब्द ऐकून त्यांना थोडेसें आश्चर्य वाटलें. "राजाभाऊ, कोणाची रे तंगडी मोडायचा विचार आहे? आमची कीं काय? बायको आली म्हणून आम्हांला घरांत यायची बंदी होय ? "

राजाभाऊ खो खो करून हंसूं लागले. "वा: जी वा:! सदूभाऊ, तूं तर कमालच केलीस! अरे, तुझ्या मन्याला उद्देशून तें मी बोललों, तुला नव्हे."

"कां रे बोवा, त्यानें काय तुझं घोडं मारलं!"

"घोडं नाहीं पण आमचा पोपट मारायचा बेटा एखादे दिवशीं."

सदूभाऊंचें आतां कुठें त्या नवीनच टांगलेल्या पिंजऱ्याकडे लक्ष गेलें व पोपटानेंही "या विठूजी या. नमस्कार, ठीक आहे ना?" हा स्वागतमंत्र सदूभाऊंना पाहून म्हटल्याचें ऐकतांच त्यांना पोपटाचें मोठें कौतुक वाटलें. राजाभाऊंच्या पत्नीचा पोपट म्हणून कळतांच त्यांना गंमत वाटली. पण पोपटामुळें आपल्या मन्याला राजाभाऊंचें घर बंद करण्यांत आल्याचें आठवतांच त्यांना वाईट वाटलें व रागही आला. पण ती वेळ त्यांनीं तशीच मारून नेली. नंतर दोघां मित्रांचा चहा व गप्पा होऊन त्या दिवशींची बैठक खलास झाली.

पण त्या दिवसापासून राजाभाऊंच्या पुढच्या खोलीचें दार व खिडकी आपली बहुतेक लावलेली. अर्थातच हा बंदोबस्त पोपटाकरितां होता. पोपटाला सारा दिवस पिंजऱ्यांत कोंडून रहाणें आवडत नसे. आणि तो जेव्हां जेव्हां बाहेर सोडला जाई तेव्हां तेव्हां वत्सलाबाई किंवा राजाभाऊ दार व खिडकी गच्च लावून घ्यायला विसरत नसत. म्हणजे मग बिलकूल मन्याची धास्ती बाळगायला नको.

पण सदूभाऊंना वाटलें कीं राजाभाऊला बायको आल्यापासून आतां आपली संगत टाळावीशी वाटूं लागली आहे. त्यांचें मन फार खट्टू झाल. त्यांतच आपल्या लाडक्या मन्याला घरांत बिनकूल न घेण्याबद्दलच्या त्यांच्या निर्धाराबद्दल त्यांना राजाभाऊंचा व विशेषतः त्यांच्या पत्नीचा आणि पोपटाचा फार राग आला. या सर्वांचा परिणाम असा झाला कीं राजाभाऊंचे मनांत बिलकूल कांहीं किल्मिष नसतां सदूभाऊ मात्र राजाभाऊंशीं पूर्वीप्रमाणें मोकळेपणानें वागतनासे झाले.

राजाभाऊला या त्यांच्या अलीकडील वागणुकीचा मोठा अचंबा वाटे. एरवीं राजाभाऊ मन्यावर, पूर्वीप्रमाणेंच ममता करीत पण त्याला घरांत मात्र येऊं देत नसत एवढेंच. सदूभाऊंचें मन दुखवूं नये म्हणून त्यांनीं आपल्या बायकोलाही 'मन्यावर ममता करीत जा. त्याला हिडिस् फिडिस् करूं नकोस.' म्हणून बजावून ठेवेंल होतें. अन् ती आज्ञाधारक पत्नी पण त्याप्रमाणें खरोखरीच करी. मात्र घरांत नव्हे हो! गॅलरींत किंवा सदूभाऊंच्या घरांत!—

सदूभाऊंना हें सर्व ढोंग वाटूं लागलें. एक दिवस तर त्यांनीं राजाभाऊला तसें स्पष्ट बोलूनही दाखविलें. राजाभाऊंनीं सदूभाऊंची पुष्कळ समजूत करण्याचा यत्न केला. पण शेवटीं सदूभाऊंनीं हट्ट

घेतला कीं, " राजा, तुझं जर माझ्यावर खरें मित्रप्रेम असेल तर त्या पोपटाला लावून दे तुझ्या बायकोच्या माहेरीं. नाहीं तर—"

" नाहीं तर काय रे सदूभाऊ ?"

" नाहीं तर यापुढें आपली दोस्ती टिकणार नाहीं."

" काय ? सदूभाऊ, तूंच का हें बोलत आहेस ?"

" अरे, किती क्षुल्लक बाब ? अन् तेवढ्यावरून तूं आपल्या आदर्श मैत्रीचा चुराडा करायला तयार व्हावंस हं !"

" तें कांहीं नाहीं, तुला माझ्यापेक्षां तुझी बायको अन् तिचा पोपट जास्त झालीं आहेत. मी म्हणून इतके दिवस स्वस्थ बसलों. आतां नाहीं मी तें सहन करणार ! मुकाट्यानें पोपट सोडून देतोस कीं माझी मैत्री सोडतोस तें बोल."

राजाभाऊला मोठा पेंच पडला. काय करावें हें त्यांना सुचेना विचार करून काय तें सांगतों म्हणून त्यांनीं सदूभाऊंकडून एक दिवसाचा अवधि मागून घेतला.

सदूभाऊंनीं बायकोस विचारलें, पण पोपट तिचा जीव कीं प्राण, ती तो सोडायला तयार नव्हतीसें दिसलें. उगीच नवऱ्याखातर मात्र वरकरणी ती म्हणाली, " इतकं आहे तर मी सोन्याला बाबांकडे देतें कशी, उगीच इकडे अन् इकडच्या मित्रांना मनस्ताप नको. मग माझ्या सोन्यानंच माझ्यावांचून माझ्या माहेरीं प्राण टाकला तरी हरकत नाहीं." एवढें बोलून वत्सला तोंड वळवून स्फुंदूं लागलेली पाहून राजाभाऊंचा जीव वरखालीं होऊं लागला. त्यांनीं पत्नीचे डोळे धोतराच्या सोग्यानें पुसले व " उगी उगी, वाईट वाटून घेऊं नको कांहीं. वाटेल तें होवो,

तुझ्या पोपटाला मी कधींहि अंतर देणार नाहीं. झालं ?" असें तिला प्रेमळ आश्वासन दिलें.

पत्नीच्या हंसणाऱ्या पण अश्रूंनीं भिजलेल्या ओल्या गालावर एक लाडीक टिचकी मारून राजाभाऊ निर्धारानें बाहेर आले. अन् सदूभाऊंच्या आंतून लावलेल्या दारावर जोरानें टिचक्या मारल्या. सदूभाऊंच्या पत्नीनें दार उघडलें. सदूभाऊ रागांतच आरामखुर्चीवर वर्तमानपत्रांत डोळे खुपसून पडले होते. त्यांनीं आंत आलेल्या राजाभाऊंकडे मुद्दामच पाहिलें नाहीं. राजाभाऊंनीं हांक मारिली, " सदूभाऊ " सदूभाऊंनीं वर्तमानपत्र थोडें खालीं करून " कां " म्हणून घोगऱ्या आवाजानें विचारलें.

" सदूभाऊ, जरा विचार कर ना ! पोपटाला टाकून देतां येत नाहीं. तूंच मन्याला तरी—"

"काय म्हणतोस राजा ? मन्याला मीं कुठेंतरी टाकावें असेंच ना तुझें म्हणणें ? वा: छान्, बायकोच्या पोपटापुढें मित्राच्या मांजराची तुला एकूण पर्वा नाहींतर. नसायचीच ! मित्राची पारख लवकर झाली म्हणून बरें झालें. ईश्वरा ! अशा मित्रांपासून आमचें रक्षण कर रे बाबा ! "

राजाभाऊंना आतां थोडा राग आला सदूभाऊंच्या या बोलण्याचा. ते म्हणाले, " सदूभाऊ तुझं असं म्हणणें कीं तो बिचारा पोपट तुझ्या मन्याच्या भक्षस्थानीं पडला काय किंवा माझ्या बायकोच्या माहेरीं तिच्यावांचून तडफडून मेला काय, तुला त्याचं कांहींच वाटत नाहीं. आम्हीं मात्र आमच्या मित्रांच्या मांजराकुत्र्यांवरही माया करावी अन् आमच्या मित्रांनीं आमच्या पोपटाला खुशाल मृत्युमुखीं लोटायला तयार व्हावें. हीच तुझ्या मैत्रीची कसोटी ना ? "

" राजाभाऊ, बोललास तेवढं पुष्कळ झालं. आतां याउप्पर मला तुझा एक शब्दहि ऐकून घ्यावयाचा नाहीं. आजपासून — नव्हे या क्षणापासून माझा तूं मित्र नव्हे व मी तुझा मित्र नव्हे. बस्स्. झाला एवढा तमाशा पुरे. जा आतां. पडूं दे मला जरा स्वस्थ. "

वरील भांडण अर्थातच चाळींतले सर्व लोक ऐकतच होते. या दोन मित्रांचा हा निर्वाणीचा झगडा पाहून त्यांनाहि अचंबा वाटला. पण त्यांच्या मध्यें पडून त्यांची दिलजमाई कोण करणार ? त्या दिवशीं त्यांचें भांडण हा सर्व चाळींत चर्चेचा एक विषय होऊन बसला.

वरील भांडण होऊन आज जवळ जवळ दोन आठवडे झाले होते. दोघेहि आपआपल्यापरीनें एकमेकांना टाळण्याचा प्रयत्न करीत होते.

पण दोघानांहि एकमेकांवाचून चैन कसें तें पडत नसे. दोघेहि आपआपल्या ठिकाणीं अत्यंत उदास व खिन्न होते. प्रत्येकास वाटे, दुसऱ्यानें बोलायला सुरवात केली तर किती छान होईल ? पण अहंकारामुळें कोणीच मौनव्रत सोडायला तयार होईना. शेवटीं सदूभाऊंच्यानें अगदीं राहवेना. सदूभाऊंना आज देवयानी बोलपटाचा दोन इसमांचा पास त्यांच्या दाट परिचयाच्या एका थियेटर मॅनेजर कडून आला होता. तो देवयानीचा ' प्रिमायर शो ' म्हणजे अगदीं पहिलाच खेळ होता. सदूभाऊंना वाटलें, राजाभाऊंशीं बोलायला ही संधि बरी आहे. राजाभाऊंची बायको गांवांतल्या एका मावस बहिणीच्या घरीं कुणाचंसं डोहाळ जेवण होतं तिकडे सकाळपासून गेली होती. जातांना तिनें ' पोपटाची नीट काळजी घ्या ' म्हणून नवऱ्यास बजावलें होतें. राजाभाऊंच्या ऑफिसला सुटी असल्या कारणानें ते घरींच होते. तेव्हां "कांहीं

काळजी करूं नको, मी घरींच आहें, तूं येईपर्यंत पोपटाला संभाळीत बसतों. " असें तिला आश्वासन दिलें होतें.

दुपारचे बाराचे ठोके घड्याळांत नुकतेच पडले होते. राजाभाऊ कसली तरी कादंबरी वाचीत कॉटवर पडले होते. पोपट मधून मधून पोपटपंची करीत होता; व राजाभाऊ वाचतां वाचतां मध्येंच उठून त्याला 'विठूमिया' म्हणून हांक मारून रंजवीत होते. पोपटाची



सर्व मांजरें सोन्याचा जीव घ्यायला टपलेलीं आहेत

मालकीण कुठें दिसत नसल्यामुळें तो बेचैन झाला होता. हें ओळखून राजाभाऊ त्याला मालकिणीचा विसर पडावा म्हणून हरतऱ्हांनीं रंजविण्याचा प्रयत्न करीत होते.

इतक्यांत शेजारच्या रामूनें त्यांना एक चिठ्ठी आणून दिली. चिठ्ठी सदूभाऊंची होती व तींत " मला आज देवयानीच्या दोघांचा पास

आला आहे. तरी तुम्ही येऊं इच्छित असल्यास आपण दोघेहि जाऊं असें म्हणतों. येत नसाल तर पास फुकट जाईल. आजपर्यंत आपण एकहि सिनेमा एकट्यानें कधींहि पाहिला नाहीं. मग आजच कसा मी पाहूं शकणार ?" असा मजकूर होता.

चिठ्ठी वाचतांच राजाभाऊंना पराकाष्ठेचा आनंद झाला. 'अखेर जिंकली कीं नाहीं?' असा अभिमान त्यांच्या चेहऱ्यावर स्पष्ट प्रति-



असा भेसूर देखावा दिसूं लागला ! ( पृष्ठ ६८ )

बिंबित झाला. आनंदाच्या भरांत ते धांवतच सदूभाऊंकडे गेले. व त्यांच्याशीं मोठ्या उत्साहानें हस्तांदोलन करून म्हणाले, " सदूभाऊ, मला वाटलंच होतं कीं तुमचा रुसवा फार दिवस टिकणार नाहीं म्हणून. बरं, झालं ते झालं. आतां आपण ते पार विसरून जाऊंया. शो केव्हांचा आहे म्हणालांत ?"

" दुपारीं १॥ चा हा स्पेशल शो आहे वृत्तपत्रीय लोकांकरितां. आपल्याला बाल्कनीचा पास आहे. एकला घरांतून निघालं पाहिजे बरं का ! " सदूभाऊ उत्तरले.

एकच्या सुमारास राजाभाऊंनीं पिंजऱ्यांत पेरू, डाळिंब वगैरे फळें व पाणी यांची नीट तरतूद करून दारें, खिडक्या नीट बंद करून पुढल्या दाराला कुलूप लाविलें आणि किल्ली त्याच मजल्यावर रखमाकाकू रहात होत्या, त्यांच्या मुलीकडे देऊन बायको घरीं येतांच तिचेकडे किल्ली देण्यास सांगितलें व ते अन् सदूभाऊ सिनेमास गेले. पण सिनेमाथिएटरांत आल्यावर मात्र राजाभाऊंना आपण उगीच आलों पोपटाला टाकून असें वाटूं लागलें. चित्रपट बहारीचा होता. आणि त्यांतल्या त्यांत पद्मा शालिग्राम हिचा नायिकेचा अभिनय इतका सहजसुंदर व गायन इतकें कर्णमधुर होतें कीं, राजाभाऊ आपल्या मित्राप्रमाणेंच चित्रपट पाहण्यांत अगदीं दंग होऊन गेले. अन् कांहीं वेळ त्यांना घरादाराचा विसर पडला. पण जेव्हां का कचाला राक्षसांनीं तुकडे तुकडे करून ठार मारल्याचा देखावा त्यांना पडद्यावर दिसला, तेव्हां मात्र ते चटकन् भानावर आले. अन् एकाएकीं घरीं एकटाच असलेल्या पोपटाची त्यांना आठवण झाली. आतां पडद्यावर त्यांना त्याच्या ऐवजीं त्यांचा पोपट सोन्या आणि राक्षसांऐवजीं सदूभाऊंचा बोका मन्या आणि गांवांत असतील नसतील तेवढीं सर्व मांजरें सोन्याचा जीव घ्यायला टपलेलीं आहेत असा भेसूर देखावा दिसूं लागला ! राजाभाऊंचें डोकें सुन्न झालें ! खेळ ऐन रंगांत आला होता तरी राजाभाऊ मध्येंच उठून जाऊं लागले. सदूभाऊंनीं त्यांना विचारलें, " अरे, मधेंच

कुठें चाललास ? " त्यावर राजाभाऊंनीं लघुशंकेचें निमित्त पुढें करून तेथून काढता पाय घेतला. आणि ते जवळ जवळ धांवतच तडक आपल्या खोलीवर आले. तेथें येऊन पहातात तों काय? रखमाकाकूंच्या दाराला कुलूप. रखमाकाकूंनीं किल्ली कोणाकडे देऊन ठेवली कीं काय त्याची त्यांनीं चौकशी केली. पण छे! त्यांनीं कोणाकडेच राजाभाऊंची किल्ली दिली नव्हती. राजाभाऊंनीं खिडकींत चढून खोलीच्या दरवाजावर असलेल्या वाटोळ्या व्हेंटिलेटर मधून डोकावून पाहिलें. पण काय आश्चर्य, पोपटाचा पिंजरा पण टांगल्या ठिकाणीं त्यांना दिसला नाहीं. आतां मात्र राजाभाऊंची पांचावर धारण बसली. त्यांचे पाय लटपटूं लागले, छाती धडधडूं लागली, सर्वस्वीं घात झाला, अशी त्यांची मुद्रा भयभीत दिसूं लागली आणि ते गॅलरींतच कपाळाला हात लावून मटकन् खालीं बसले! त्यांच्या मनास नाना तऱ्हेच्या शंका कुशंका भंडावून सोडूं लागल्या. रखमाकाकूंच्या मुलीनें खेळण्याकरितां म्हणा किंवा पोपटाशीं बोलण्याकरितां म्हणा, दार उघडलं असलं पाहिजे. अन् मग सदूभाऊंच्या मन्यानें येऊन पोपटावर झडप घातली असली पाहिजे असें त्यांच्या भांबावलेल्या मनानें घेतलें. नुकताच सिनेमांत पाहिलेला कचाच्या मृत्यूचा देखावा त्यांना आठवला अन् त्यांचे अंग थरारलें. "त्या बेट्या सद्याचीच ही कारवाई असली पाहिजे. त्यानें जणूं पोपटाला मारण्याचा कटच केला होता आज. मला सिनेमाला घेऊन जायचं अन् इकडे बायकोकडून नाहींतर रखमाकाकूंच्या मुलीकडून दार उघडून पोपटावर मन्याला मोकाट सोडायचं आणि मग पोपट मेला म्हणजे पिंजरा कुठं तरी लपवून ठेवायचा! आयता कांटा निघाला! अरे सद्या, बाहेरून जसा काळा दिसतोस तसा आंतून पण काळा असशील असं नव्हतं

वाटलं मला ! म्हटलं बिचारा भांडण मोडूं पहातोय, फारा दिवसांचा मित्र, कशाला उगीच ताणून धरा म्हणून गेलों त्याच्या बरोबर सिनेमाला ! म्हणे बाल्कनीचा पास ! कुठला पास न् कुठलं काय? सगळी बतावणी, सगळी ढोंगं लेकाची ! हरामखोर कुठचा ! आतां तरी पडेल ना तुझा जीव भांड्यांत. पण माझी लाडकी वस्तु आतां मला काय म्हणेल?" या शेवटच्या प्रश्नानें मात्र राजाभाऊंच्या जिवाची फारच गाळण उडूं लागली. त्यांना पुढें विचारच करतां येईना. ते स्वस्थ गुडघ्यांत डोकें खुपसून बसून राहिले !

इकडे सिनेमाचा खेळ संपल्यावर सदूभाऊ तडक घरीं आले. राजाभाऊ लघुशंकेच्या निमित्तानें जो बाहेर पडला, तो परत सिनेमाला कां आला नसावा? या विषयीं तर्क कुतर्क करीत सदूभाऊ थोड्या झपाट्यानेंच घरीं आले. अन् येऊन पाहतात तों राजाभाऊंची स्वारी गॅलरींत आपल्या खोलीपुढें गुडघ्यांत तोंड खुपसून खिन्न होऊन बसलेली त्यांना दिसली.

" अरे राजाभाऊ, मध्येंच कां उठून आलास? अन् असा काय बसलाहेस मध्येंच गॅलरींत? डोकं का दुखतंय पाहूं?"

"चल हो दूर मानभावी कुठचा. शेवटीं माझा केंसानें गळा कापलास ना? वा रे मित्र !"

"अरे पण, झालं काय एवढं भडकायला तुला? काय केलं मीं?"

" काय केलं? अरे, काय केलं नाहींस तें विचार. सगळं कांहीं करून सवरून वर अगदीं साळसूदपणाचं ढोंग आणतोय लेकाचा. शरम नाहीं वाटत !"

सदूभाऊ बिचारे या अकल्पित सरबत्तीमुळें हतबुद्धच झाले. " मौनं सर्वार्थ साधनम् " असें मनाशीं म्हणून ते आपल्या खोलींत मुकाट्यानें निघून गेले व कळेल आपोआप सगळं म्हणून कांहीं तरी वाचीत खुर्चीवर स्वस्थ पडून राहिले.

पण राजभाऊ कोठून त्यांना स्वस्थ पडूं द्यायला! ते त्यावर तावातावांतच उठले अन् सदूभाऊंच्या खिडकीशीं येऊन ओरडूं लागले.

" याद राखून ठेव सदू, माझ्या पोपटाला मारण्याचा कट तूं मोठ्या शिताफीनें साधलास खरा. पण बच्चंजी, तुझ्या मांजराला तो पोपट पचण्यापूर्वींच स्वर्गाची वाट दाखवतों थांब." असें म्हणून त्यांनीं जवळच पडलेली काठी घेतली व मन्या पलीकडे तोंडपुशी करीत बसला होता त्याचेवर ती जोरानें उगारली. प्रसंग जाणून मन्यानें पटकन उडी मारली व तो चटदिशीं तेथून निसटला म्हणून बरें! राजाभाऊंचा कधीं पाहिला नाहीं असा तो अवतार पाहून तें बिचारें मांजर विलक्षण भयभीत झालं. हा सर्व प्रकार क्षणार्धांत घडला. सदूभाऊ ताडकन् खुर्चीवरून उठले नी राजाभाऊंच्या हातांतील काठी हिसकावून घेऊं लागले. दोघांची चांगलीच जुंपली. हा प्रकार पहावयास चाळींतल्या माणसांची ही गर्दी! पण आयती फुकट गंमत पहायची संधि कोणी दवडावी? असा पोक्त (?) विचार करून कोणीही त्यांच्या भांडणांत पडलें नाहीं.

झालें, मारामारी ऐन रंगांत आली. तसें पाहतां राजाभाऊंची आंगकाठी धिप्पाड व बळकट. सदूभाऊ अशक्त व अंगानें लुकडेच होते. राजाभाऊंचा पोपट नाहींसा झाला आहे व तो मन्यानें गट्टम् केला असला पाहिजे अशी सदूभाऊंची देखील खात्री होऊन चुकली

होती. त्यामुळें ते शरमेनें थोडेसे नरम पडले व राजाभाऊंचे एक दोन अधिक गुद्दे खाऊन त्यांनीं या लढाईतून शिस्तवार माघार घेण्याचा पोक्त विचार केला. त्यांच्या या नरमाईमुळें राजाभाऊंचाहि उगारलेला हात ढिला पडला अन् हें अपूर्व द्वंद्वयुद्ध तात्पुरता तहनामा होऊन तहकूब झालें! राजाभाऊ मग निमूटपणें गॅलरींत आले, त्यांचाहि राग आतां बराच शमला होता. रागाची जागा आतां खेदानें घेतली होती. सदूभाऊवर आक्रमण करून त्याला खरपूस चोप दिला या गोष्टींचें त्यांना फार वाईट वाटूं लागलें. त्यांचें हळवें मन त्यांना खाऊं लागलें. एकदां वाटे, पटकन् जाऊन सदूभाऊंना दृढ मिठी मारावी व त्यांची झाल्या प्रकारबद्दल क्षमा मागावी. पण त्यांचें अहंकारी मन त्यांना तसें करूं देईना. विवेक तर सारखा बोंचत होता. अशा या द्विमनस्क स्थितींत ते कठड्याला टेकून उभे होते. पण काय चमत्कार! रखमाकाकूंची सुशी पोपटाचा पिंजरा घेऊन धाड् धाड् जिना वाजवीत हंसत खिदळत वर आली. पोपट खुशाल आहे हें पहातांच राजाभाऊंचा आनंद गगनांत मावेना. त्यांनीं चटकन् जाऊन सुशीच्या हातांतून पिंजरा घेतला. तिनें पुढें केलेली किल्ली घेऊन खोलीच दार उघडलें. पिंजरा जागच्या जागीं टांगला आणि मग सुशीला विचारलें, "पोरी, पिंजरा घेऊन कुठें ग गेली होतीस?" सुशीच्या "हें पहा, किनै, त्याचं असं झालं" वगैरे पूरक शब्दांच्या भारूडांतून राजाभाऊंना हवी होती ती हकिकत एकदांची समजली. मौज अशी झाली कीं, राजाभाऊ सदूभाऊंबरोबर सिनेमाला रखमाकाकूंकडे किल्ली ठेवून गेल्यावर सुशीकडे तिच्या मैत्रिणी खेळायला म्हणून आल्या. आणि मग खेळतां खेळतां सुशीनें आपल्या मैत्रिणींना राजाभाऊंकडे सुंदर व

बोलका पोपट असल्याचें सांगतांच त्यांनीं पण पोपट पहाण्याचा हट्ट धरला. मग राजभाऊंची खोली उघडून सुशीनें त्यांना पोपट दाखविला. एवढ्यांत सदूभाऊंचा मन्या तेथें म्यॉंव् म्यॉंव् करीत आला. तो पिंजऱ्यावर उडी घालणार इतक्यांत सुशीच्या एका लहशा मैत्रिणीनें त्याच्या पाठींत बक्कन् एक धपका घातला. त्या सरशीं बोका पार पळून गेला. पण तो परत येऊन पोपटाला त्रास देईल म्हणून सुशीनें पिंजरा आपल्याबरोबर एका मैत्रिणीच्या घरीं नेला. तिथं देखील पोपटाचं फार कौतुक झालं अन् बराच वेळ सर्व मुली त्याच्याशीं गंमत गंमत करीत बसल्या होत्या. शेवटीं संध्याकाळ झाली म्हणून सुशी उठली व पिंजरा घेऊन घरीं आली.

राजाभाऊंना ही हकिकत ऐकून सुशीच्या शहाणपणाचें फार कौतुक वाटलें व त्या भरांत त्यांनीं तिचा एक गोडसा पापा घेतला. सुशीनें आपल्या कामगिरीबद्दल राजाभाऊंकडून बक्षीस म्हणून खाऊ घेतला तो वेगळाच.

आतां मात्र राजाभाऊंना पुरा पश्चात्ताप झाला. आपण सदूभाऊंवर भलताच संशय घेऊन त्यांना मार देण्यापर्यंत पाळी आणली याबद्दल त्यांचें अंतःकरण आंतल्या आंत कढूं लागलें अन् त्यांनीं भावनेच्या भरांत चटकन् उठून जाऊन सदभाऊंचे पाय धरले.

सदूभाऊंनीं दार बंद केलें असल्यामुळें बाहेर झालेला प्रकार त्यांना मुळींच माहीत नव्हता. त्यांना राजाभाऊ आतां आपले पाय कां धरीत आहे तें नीट समजेना. त्यांचा पोपट आपल्या मांजरानें मारला असतांही केवळ सज्जनपणामुळेंच पश्चाताप—दग्ध होऊन

राजाभाऊ आपले पाय धरीत आहे असें समजून सदूभाऊंनीं त्यास वर उठविलें व "राजाभाऊ, हें काय? मी तुझा अपराधी तेव्हां मीच हवा तर तुझे पाय धरतों नी क्षमा मागतों."

राजाभाऊंनीं त्यांचें लगेच निवारण केलें व म्हटलें, "छे छे! सदूभाऊ, मींच तुझा गहन अपराध केला. मला संशयपिशाच्चानें पछाडलें अन् तुझ्यासारख्या सज्जन मित्रावर हात टाकायला लावलें आहे. सदूभाऊ, माझ्या पातकाची निवृत्ति कशी होईल देव जाणे?" असें म्हणून त्यांना गहिंवर आला. सदूभाऊंच्याहि डोळयांना टचकन् पाणी आलें. तें पुसून टाकून त्यांनीं राजाभाऊंस विचारलें, "संशयपिशाच्च कसल? ही काय भानगड?"

"अरे सदूभाऊ, आमचा पोपट खुशाल आहे." सदूभाऊंनीं खुर्चीवरून ताडकन् उडी मारिली.

"काय, म्हणतोस तरी काय? तर मग माझ्या मन्यावर उगाच आळ घेतलास म्हणायचा?"

"होय, मींच मूर्खानें तुमच्याविषयीं उगीच संशय घेऊन हें वादळ निर्माण केलें." आणि त्यावर त्यांनीं सदूभाऊंस सगळी हकिकत संगतवार सांगितली. दोघां मित्रांचा पुनश्च पूर्ण मिलाफ झाला. दोघांच्या आनंदाश्रूंत दोघांच्या मनांतील एकंदर किल्मिषें पार वाहून गेलीं. त्यांचीं मनें पूर्ववत् साफ झालीं. दोघांनीं आनंदाच्या भरांत एकमेकांस कडकडून मिठ्या मारल्या व पुनः म्हणून कधीं आपण एकमेकांशीं भांडायचें नाहीं अशा आणाशपथा वाहिल्या. दोघेही मग गप्पा मारीत बसले.

तितक्यांत मन्या म्यॉंव् म्यॉंव् म्यॉंव् करीत आंत आला अन् उडी मारून सदूभाऊंच्या मांडीवर जाऊन बसला. मात्र राजाभाऊंच्या नजरेला तो कांहीं केल्या नजर देईना. तेव्हां राजाभाऊंनीं त्यास उचलून घेतलें, त्याच्या मिशा कुरवाळल्या आणि ते मन्याला लडिवाळपणें म्हणाले, "गुलामा, तुझ्या मालकाला मी चार रट्टे द्यायला कमी केलें नाहीं तर तुला एकादा तरी नको काय ? आणि म्हणून माझ्यावर रुसलास होय ? चल, मी तुला दूध घालतों." असें बोलून ते त्याला आपल्या घरांत घेऊन गेले. सदूभाऊंना बरें वाटलें. राजाभाऊंचा पोपट येऊन मन्याला त्यांचें घर वर्ज्य झालें त्याला आज जवळ जवळ महिना होऊन गेला होता. आज एक महिन्यानें पुन: मन्याला राजाभाऊंच्या घरांत प्रवेश मिळाला होता. सदूभाऊंना आपल्या मित्राच्या स्वभावाचें मोठें कौतुक वाटलें व मित्र असावा तर असा निर्मल मनाचा असावा असा हि विचार त्याच्या मनांत आल्या वांचून राहिला नाहीं. घडलेल्या एकंदर प्रकाराबद्दल विचार करण्यांत सदूभाऊ गढून गेले असतां खोलींत एका निराळ्याच व्यक्तीनें प्रवेश केला. ती व्यक्ति म्हणजे त्यांचा एक जुना आचारी विसोबा भोळे होय. तो सहज आज सदूभाऊंना भेटावयास आला होता. इकडचें तिकडचें बोलणें झाल्यावर विसोबांनीं हळूच सदूभाऊंना मन्या कोठें आहे, म्हणून विचारलें. अर्थात् मन्या विसोबांच्याहि चांगला ओळखीचा होता. शेजारीं राजाभाऊंकडे दूध पिण्यास गेला आहे असें सदूभाऊंनीं सांगितलें. विसोबा म्हणाले, "मालक, एक विनंति करायची आहे. मला तेवढा मन्या देतां का ? मी कायमचा नाहीं मागत. अगदीं थोडे दिवसां पुरता मागतों. माझ्या खाणावळीच्या कोठींत उंदरांनीं नुसता धुडगूस घातला आहे ! अलीकडे काय लेकाचे

नासधूस करतात धान्याची वगैरे कांहीं विचारूं नका. तुमचा मन्या माझ्या संवयीचा आहे. राहील चार दिवस माझ्याकडे. तेवढ्यानें हा उंदराचा त्रास तरी जरा कमी होईल." सदूभाऊंनीं क्षणभर विचार केला आणि मग त्यांची मुद्रा निश्चयी दिसूं लागली. आपल्या मैत्रींत बिघाड उत्पन्न करणारें भांडणाचें मूळच नाहींसें करणें हेंच या वेळीं शहाण-पणाचें होईल असा त्यांनीं मनाचा धडा केला. विसोबा मन्याला आयतेच न्यायला आलेले पाहून सदूभाऊंना त्यांतल्या त्यांत हा योगा-योग मोठा गंमतीचा पण फायदेशीर वाटला. त्यांनीं लगेच विसोबास मन्याला घेऊन जाण्यास परवानगी दिली. विसोबांना आश्चर्य वाटलें कीं, मन्या द्यायला सदूभाऊ इतक्या लौकर कसे तयार झाले? पण अंदरकी बात राम जाने! विसोबांना या होकाराची पार्श्वभूमि कोठें ठाऊक होती? असो, विसोबांना आपलें काम झाल्याचा आनंद झाला. त्यांनीं लगेच राजाभाऊंकडून मन्याला कबज्यांत घेतलें व नमस्कार करून सदूभाऊंचा निरोप घेतला. इकडे राजाभाऊ पोपटाला खायला घालून सदूभाऊंकडे येतात तों ते म्हणाले, "राजा, एकूण या प्रकरणांत शेवटीं तूं जिंकलेंस. काढ एक ग्रॅंड फीस्ट."

---

# ७. संमेलनाचें सर्वोत्तम बक्षीस !

त्या शहरांत हें 'सरस्वती भवन' नांवाचें मुलींचें हायस्कूल एक नमुनेदार संस्था म्हणून फार नावाजलेलें होतें. शाळेंत सर्व इयत्ता मिळून जवळ जवळ ३०० मुली होत्या. आमची कमल काळे शाळेंतील अत्यंत हुशार मुलींत गणली जात असे. ती सातवींत होती. तिच्या यत्तेच्या मानानें ती वयानें लहान होती—निदान अंगानें सडपातळ व उंचीनें थोडीशी ठेंगूच असल्यामुळें ती तशी दिसायची, म्हणाना ! शाळेंत आल्यापासून प्रत्येक यत्तेंत तिचा पहिला किंवा फार तर दुसरा नंबर ( क्रमांक ) अगदीं ठरलेला. त्याच्याहून खालीं तिचा नंबर कधींच गेला नव्हता. बौद्धिक विषय सोडल्यास व्यायामांत नी खेळांत देखील ती तीतकीच चलाख असे आणि शाळेचे जेव्हां वार्षिक मैदानी खेळ होत त्यांतहि कांहींना कांहीं बक्षिसें पटकावल्यावांचून ती रहात नसे.

कमलची अगदीं जिवाभावाची मैत्रीण म्हणजे तिच्या वर्गांतलीच विमल वागळे. विमल अभ्यासांत जरी कमलहून थोडी कमी होती; तरी गायन, वादन, चित्रकला, शिवणकला, हस्तकौशल्य अशा कलात्मक विषयांत ती कमलपेक्षां थोडीफार सरस होती आणि त्यामुळें गंमत अशी होई कीं, एखाद्या महिन्यांत किंवा तिमाहीपरीक्षेंत कधीं कधीं विमल कमलपासून पहिला नंबर हिसकून घेई. तरी पण परीक्षेंतल्या चुरशीमुळें त्या मैत्रीणींमधील सख्य कधीं कमी तर झालेंच नाहीं पण उलट वाढतच गेलें !

त्या दोघी एकमेकींच्या घरीं अभ्यासाकरितां व क्वचित् खेळण्याकरितांहि जात येत व पुष्कळदां त्यांचें एकमेकींच्या घरीं खाणेंपिणें व विशिष्टप्रसंगीं जेवणहि व्हायचें. घरांत कोणताहि एकादा चांगला

पदार्थ आईनें केला कीं एकीनें दुसरीस आपल्या घरीं बोलावल्यावांचून तो खाऊं नये इतका दोघींचा निष्कपट व गाढ स्नेह होता. वर्गातल्या पुष्कळ मुलींना या त्यांच्या मैत्रीचा हेवा वाटे व त्यांच्यांत वितुष्ट आणण्याचे अनेक प्रयत्न कांहीं खवचट व मत्सरी मुलींकडून करण्यांत येत ते सर्व निष्फळ ठरत. ग्रहणानंतर चंद्राचें तेज, सौंदर्य जसें अधिकच खुलून दिसतें तसेंच वरील प्रयत्नानंतर कमल–विमलमधील प्रेमाला जास्तच तजेला चढल्याचें सर्वांना प्रत्यंतर येई.

शाळेंत चित्ररेखन, वक्तृत्व किंवा निबंध-लेखनाच्या चढाओढी होत. त्या वेळीं दोघींपैकीं पहिल बक्षीस कोणास द्यावें याबद्दल पंचांना अनेकदां पेंच पडायचा व कित्येकदां पहिलें बक्षीस दोघींमध्यें सारखें वांटून देण्यापर्यंत पाळी यायची ! पण अशा वेळीं मात्र विमल पड खाऊन म्हणायची, "सर, कमललाच पहिलें बक्षीस द्याना. माझी कांहीं हरकत नाहीं त्याला. मला दुसरें मिळालें तरी चालेल." त्यावेळी कमल म्हणायची, " हें काय विमल ? अशानं मी तुझ्याशीं गट्टी फू करीन बरं का ? पण बयं, तुला मुळीं यांत मधें बोलायचा अधिकारच काय ? पंचांच्यापेक्षां तूं स्वतःला जास्त शहाणी समजतेस वाटतं ? " यावर सर्वजण खो खो हंसत व सरते शेवटीं पहिले बक्षीस दोघींत समसमान वाटलें गेल्याचा निर्णय जाहीर होई.

शाळेच्या प्रमुखांनीं यंदाचें वार्षिक संमेलन नवीन तऱ्हेनें साजरें करण्याची टूम काढली होती. यंदां संमेलन शाळेंत न भरवतां शहरापासून जरा दूर असलेल्या सुप्रसिद्ध योगेश्वरी-वनांत घडवून आणावें व सबंध दिवसभर उपहार भोजन, गायन—वादन, नाट्य, संवाद वगैरे विविध

व मनोरंजक कार्यक्रम करावे असें त्यांनीं आपल्या शिक्षक वर्गाच्या संमतीनें ठरविलें आणि त्याप्रमाणें आगाऊच वर्गांतून सूचनापत्रकें Circulars फिरविण्यांत आलीं. मुलींना ही टूम फार आवडली. एका धोंड्यानें दोन पक्षी मारण्याची ही पद्धत उत्तम असा सर्वांचाच अभिप्राय पडला. कारण संमेलनापरी संमेलन होईल आणि शिवाय एक मजेशीर सहल पण केल्यासारखें होईल. दिवस रविवारचा ठराविला असल्यानें ज्यांची इच्छा असेल अशा पालकांना पण या संमेलनाला येण्याची खास विनंति एका पत्रकाचें द्वारां करण्यांत आली होती.

वर्गणी माफक असल्यानें गरीबांपासून श्रीमंतांपर्यंत सर्व विद्यार्थिनींना संमेलनांत भाग घेतां येईल अशी योजना चालकांनीं मुद्दाम केली होती. शिवाय सदर प्रसंगीं पैशाच्या दृष्टीनें कांहीं तूट वगैरे आल्यास चालक संस्थेची वर्गणी म्हणून संमेलनाच्या जमेस बराच हातभार लावणार होते. एकंदरींत यंदांचें संमेलन मोठें अपूर्व होईल अशी सर्व योजना आखण्यांत आली होती. शिक्षक व शिक्षिका त्याचप्रमाणें विद्यार्थिनी जवळ जवळ दोन तीन आठवडे आधींपासून कार्यक्रमाची तयारी करण्यांत गुंतल्या होत्या. संमेलन यशस्वी करण्यास लागणाऱ्या सर्व प्रयत्नांची शिकस्त करण्याचा त्या सर्वांचा निश्चय होता.

संमेलनाचा दिवस जसजसा जवळ येत चालला तसतशा नाट्य, संवाद, संगीत, काव्य, गायन वगैरे कार्यक्रमाच्या तालमीवर तालमी झडूं लागल्या. आणि संमेलना आधीं दोन दिवस जेव्हां रंगीत तालीम झाली तेव्हां तर प्रत्येकीचें काम इतकें सुंदर वठलेलें दिसून आलें कीं जमलेल्या निवडक व मार्मिक प्रेक्षकगणानें (यांत बहुतेक शिक्षक वर्गच होता) अतिशय वाहवा केली. त्यांतल्यात्यांत ज्या कांहीं थोड्या

विद्यार्थीनींना विशेष शाबासकी मिळाली त्यांत आमची कमळ–विमलची जोडी होती हे चाणाक्ष वाचकांनीं ओळखलेंच असेल.

संस्कृत शाकुंतल नाटकांतील चौथ्या अंकांतला चौथा प्रवेश बसवला होता व त्यांत कमलकडे सासरीं जाणाऱ्या शकुंतलेचें काम दिलें असून विमलकडे कण्व ऋषींचें काम सोंपविण्यांत आलें होतें. दुसऱ्या कांहीं मुलींनीं शकुंतलेच्या सख्या, गौतमी व कण्वाचे शिष्य अशा इतर दुय्यम भूमिका केल्या होत्या. नेपथ्यरचना इतकी हुबेहुब वठविली गेली होती कीं प्रेक्षकांस क्षणभर आपण त्या प्राचीन काळांतच वावरत आहोंत असा भास व्हावा! नेपथ्य रचनेचें सर्व श्रेय आमचे दोशी व नाट्यकलानिष्णात श्रीयुत गोळजेकर यांना होतें. बाकीच्या कार्यक्रमांच्या रंगीत तालमी देखील बऱ्याच यशस्वी वठल्या.

असे हे सुंदर कार्यक्रम आहेत अशी बोलवा मुलींत हां हां म्हणतां पसरल्यामुळ शेवटील एकदोन दिवसांत वर्गणी गोळा करणाऱ्या सन्मान्य चिटणीसांची कोण धांदल! संमेलनाच्या आदल्या दिवशीं म्हणजे शनिवारीं दुपारच्या आंत तीनशेंपैकीं संमेलनाची वर्गणी न भरलेल्या अशा फार करून २०।२५ मुलीच तुम्हांला आढळल्या असत्या! याखेरीज ३०।४० पालक (यांत अर्थात् पालिकाहि होत्या) वन–संमेलनास निश्चित येणार होते तें वेगळेच.

\+ + + +

म्हणतां म्हणतां ज्याची सर्वजण अत्यंत अधीरतेनें वाट पहात होते तो रविवार उजाडला. पहाटेस बरोबर ५॥ वाजतां मुलींनीं शाळेच्या आवारांत जमायचें व तेथून सर्वांनीं मिळून डबे 'रिझर्व' केलेल्या

बरोबर ५।५५ च्या आगगाडीनें निघून वनसंमेलनाच्या ठिकाणालगत असलेल्या स्टेशनास जावयाचें असें नक्की ठरलें होतें. स्वयंसेविकादलाची व्यवस्था इतकी उत्कृष्ट होती कीं अगदीं लहान मुलींपासून सर्वजणी बिनबोभाट व बिनात्रासानें अगदीं वक्तशीरपणें ठरलेल्या गाडीनें चढून बसल्या.गाडी सुटायला आतां फक्त अर्धे मिनिटच असेल. परंतु वाचकहो ! आपली कमल पाहिलीत का ? प्लॅटफॉर्मवर इकडे तिकडे पाहात अजून उभीच ! अर्थात् मुलींनीं ओळखलें कीं ही आपल्या निकटच्या मैत्रिणीला म्हणजे विमल वागळेलाच पहात असेल. शेवटीं गार्डास दोन सेकंद थांबावयास विनंति करून श्रीखंडे मास्तर गाडींतून खालीं उतरलें व जरा खेकसूनच म्हणाले, 'काळे, कुणाला पहात आहेस ? गाडींत चढ ना ! निघाली गाडी. यायचें आहे कीं नाहीं तुला ?'

"सर, यायचं आहे तर. पण ही विमल वागळे इतक्यांत हो कुठें नाहींशी झाली कोण जाणे. आतां इथं होती माझ्यापाशीं उभी."

"अग चढली असेल पुढच्या कुठल्यातरी डब्यांत घाईघाईनें. हं चल तूं. चढ चढ लौकर. ही पहा शिटी झाली." कमलनें चपळाई केली म्हणून बरें. गाडी सुटली आणि ठरल्या वेळीं योगेश्वरी वनानजीक १५।२० मिनिटांच्या रस्त्यावर असलेल्या स्टेशनवर तिनें सर्व संमेलने-च्छूंना आणून सुखरूप पोंचविलें. गाडींत असतांना अर्थात् कमल काळे-भोंवतीं मुलींचा गराडा साहजिकच पडून तिच्यावर प्रश्नांची सरबत्ती झडली. तेव्हां आत्म-बचावासाठीं तिनें सांगितलेली हकीकत अशी:—"हें पहा, विमल वागळे किनै मजकडे पहांटे ५ वाजतां आली होती व आम्ही दोघी मिळून गाडी पकडण्यासाठीं म्हणून स्टेशनवरच थेट आलों.

मी न विमल प्लॅटफॉर्मवर उभ्या होतों इतरांशीं बोलत. इतक्यांत विमल मला काय म्हणाली, "आलें हं कमल मी. त्या शहाणेबाई पलीकडे उभ्या आहेत ना, त्या मला खुणावताहेतसं वाटतं. आत्तां येतें हं जाऊन" असें बोलून ती गर्दींत घुसली. माझं कांहीं नीटसं लक्ष नव्हतं. पण मला वाटलं ती येईल परत म्हणून उभी होतें तिची वाट पहात. पण मग ती घाईनं म्हणून पुढच्या कुठल्या तरी डब्यांत चढली कीं काय कुणास ठाऊक !"

"वा, असं कसं होईल ? तुमची जोडी आजपर्यंत कधीं फुटलेली कुणीं पाहिली आहे काय ? मग या आगगाडीचीच काय बिशाद ती फोडण्याची ?" एक मुलगी खंवचटपणें म्हणाली.

"वा ग वा. अग, आगगाडी आहे ती ! मोठमोठे खंडाळ्यासारखे खडक तिनं फोडलेन् आपली वाट काढायला, मग कमलविमल तर काय त्या खडकांहून कठीण नाहींत ना ?" दुसरीनं तिला साथ केली. यावर त्या मुलींत खूप हंशा पिकला. कमलचें मात्र या विनोदाकडे मुळींच लक्ष नव्हतें. ती निराळाच विचार करीत होती. तिचें लक्ष क्षणमात्र आपल्या घराकडे व तेथल्या परिस्थितीकडे वळले. आणि एक विचार विद्युद्वेगानें तिच्या डोक्यांतून झर्कन् निघून गेला—"विमल माझ्या घरीं तर परत गेली नसेल !" पण कमलच्या मनाची ठेवणच अशी होती कीं भोंवतालच्या गडबडीनें तिचें चित्त तेव्हांच वेधलें गेल्यामुळें वरील विचार आला तसाच क्षणार्धांत लुप्त झाला व आजूबाजूच्या खेळकर वातावरणांत ती समरस झाली. तरीदेखील विमल दुसऱ्या कोणत्या तरी डब्यांत चढली असणारच असेंही गोड आश्वासन एक

मन तिला देण्याचा यत्न करीत होतें. परंतु दुसऱ्या मनाच्या अगदीं आंतल्या कप्प्यांत विमलच्या या एकाएकीं अदृश्य होण्यामुळें एक विलक्षण हुरहुर तिला वाटूं लागली होती. इतक्यांत गाडी मुक्कामास पोंचून खालीं उतरण्याच्या धांदलींत व विमल कोठें सांपडते का ते शोधण्याच्या गड-बडींत कमलची हुरहुर थोडीफार थांबली. व शेवटीं विमल आली नाहीं, मागेंच राहिली असें जेव्हां निश्चित झालें तेव्हां तिला जें थोडेंफार वाइट वाटत होतें तेंहि वाटेनासें झालें व त्याऐवजीं आपल्या मैत्रिणीचा अशा चमत्कारिक वागण्याबद्दल तिला भरपूर राग आला. "हिला जर संमे-लनाला यावयाचें नव्हतें तर तिनें तसें स्पष्ट बोलून दाखवायचें होतें. स्टेशन-पर्यंत आपल्याबरोबर येण्याचें नाटक तरी तिनें कशाला करावें?" वगैरे वगैरे आत्मगत टीकास्त्र सोडून तिनें विमलवरचा आपल्या रागाचा बंधारा फोड-ण्याचा यत्न केला आणि मग कांहीं वेळानें जेव्हां तिला लोटलीकर (७व्या नंबराची वर्ग—भागिनी) विमलच्या अनुपस्थितीचा फायदा घेऊन तिच्याशीं लगट करूं लागली तेव्हां तर विरहदु:खानें कमलनें मुक्तहस्तांनीं संत्रस्त झालेल्या तिला जवळ जवळ मिठीच मारली व 'द्वाड व ढोंगी विमलला निदान एक दिवसापुरतें तरी अजीबात विसरून जाण्याचा जणुं तिने निश्चयच केला.

वाचक हो, आपण आतां या वनसंमेलनाच्या गोड धांदलींत असलेल्या मंडळींना थोडा वेळ सोडून कमलच्या घराकडे थोडीशी नजर टाकूं या. गाडींत मुलींना हकीकत सांगतांना कमल काळेनें मुद्दामच एक दोन गोष्टींचा उल्लेख त्यांतून वगळला होता. वस्तुस्थिति अशी होती कीं, विमल वागळे आज पहांटेस जवळ जवळ ५ वाजतां जेव्हां कम-लचे घरीं आली होती, तेव्हां तिला काय दृश्य दिसलें? वाचक हो,

कमलची आई तापानें फणफणत पडली होती. घरांत कमल व तिची आई या दोघीच असल्यामुळें तिसरें कोणीहि आजाऱ्याच्या शुश्रूषेकरतां नव्हतें. राधाकाकूंना [ कमलच्या आईचें नांव ] आज बरेच दिवस ताप व खोकला येत होता. परंतु गेल्या ७।८ दिवसांपासून त्यांना जरा बरें वाटूं लागलें होतें. तेव्हां अर्थातच मुलीचा उगीच विरस नको म्हणून कमलला त्यांनीं संमेलनाची वर्गणी भरून त्यांत भाग घ्यावयास संमति दिली होती. पण शुक्रवारीं रात्रीं तापानें उलट खाल्ली आणि शनिवार व रविवार [ संमेलनाचा दिवस ] पहांटेपर्यंत ताप कांहीं उतरला नव्हता. कमलचा चेहरा फारच उतरून गेला होता. आपल्याला आतां संमेलनास जावयास मिळत नाहीं म्हणून तिला फारच वाईट वाटत आहे हें त्या प्रेमळ मातृहृदयानें तावडतोब ओळखलें व त्या लटकेंच म्हणाल्या, "कमल, मला आतां थोडें बरें वाटत आहे, बरं का बाळ! घाम पण येतोयसं वाटतं. विमल आतां आली म्हणजे जा हं तूं तिच्याबरोबर. मात्र शेजारच्या सुधाताईंना जरा माझ्याकडे लक्ष ठेवायला सांग म्हणजे झालं कांहीं लागलं बिगलं तर."

आईची ही पडत्या फळाची आज्ञा कमलनें खालीं पडूं दिली नाहीं! तिनें विशेष आढेवेढे न घेतां, 'बरं हो आई' असें म्हणून सुधाताईला सांगण्याकरतां शेजारच्या घराकडे धूम ठोकली. इतक्यांत विमल कमलला हांका मारीत तेथें येऊन पोंचली व दार लोटून आंत जातांच राधाकाकू कण्हत असल्याचें तिला दिसून आलें.

"काकू, काय होतंय् तुम्हांला? अन् कमल कुठें गेली?"

"कोण? विमल? ये बरं बाळ. कमल किनई शेजारीं सुधाताईकडे गेली आहे जराशी. येईल आतां इतक्यांत. मग जा बरें तुम्ही

दोघीजणी मिळून." राधाकाकूंनी उसनें अवसान आणून विमलला सांगितलें. पण त्यांच्या आवाजांतला क्षीणपणा विमलला जाणवल्या-वांचून राहिला नाहीं. तिनें चटकन् त्यांच्या आंगाला हात लावून पाहिलें. ताप बराच लागला.

"काकू, ताप बराच आहे कीं हो तुमच्या अंगांत. कधीपासनं ताप येतो आहे तुम्हांला?"

"झाले बरेच दिवस. वाटलें साध्या श्रमाचा ताप असेल म्हणून. म्हणून कालपर्यंत उठून कामंबिमं करीत होतें. पण परवां संध्याकाळ-पासनं किनई विमल, अंथरुणावरनं अगदीं उठवेचना. अन् काल रात्रीं ताप जास्त वाढला अन् अजून कांहीं उतरेलसा वाटत नाहीं."

"मग डॉक्टरना नाहीं का बोलावलं?" विमलनें अधीरतेनें विचारलें.

"नाहीं, म्हटलें उगीच कशाला डॉक्टर न् वैद्य इतक्यांतच. शिवाय आज तुमचें शाळेचें संमेलन आहे ना? कमलला संमेलनाबद्दल भारी उत्कंठा लागून राहिली आहे. तेव्हां पोरीचा उगीच विरस नको माझ्या म्हातारीच्या दुखण्यामुळं. म्हणून मींच तिला म्हटलं, 'जा तूं कशी संमेल-नाला विमल आली कीं.' अन् खरंच विमल, मला किनै वाटेल बरं थोड्या वेळानं. तशीच जरूर लागली तर येतील शेजारच्या सुधाताई जरा माझ्या जवळ बसायला."

"वा:, हें हो काय काकू? तुम्ही एवढ्या आजारी अन् कमलला संमेलन सुचतं तरी कसं? समजा, वेळ आहे वखत आहे, डॉक्टरला बोलवून आणावें लागलें तर वेळीं कोण जाणारं आहे इथं जवळपास? तें कांहीं नाहीं, मी सांगतें कमलला कीं, बये, आई इतकी आजारी तेव्हां

तूं कांहीं तिला अशी टाकून येऊं नको. शिवाय संध्याकाळखेरीज का परत यायला मिळायचं आहे संमेलनाला एकदां गेल्यानंतर ? ही आलच कमल, काकू. मी तिला सांगून पहातें हां. तुम्ही नका कांहीं बोलूं. स्वस्थ पडून रहा अगदीं."

कमल सुधाताईकडे बसून त्यांच्याकडचा चहा घेऊन तितक्यांत परत घरांत आली. विमल आलेली पाहून भिंतीवरच्या अलार्मकडे नजर टाकून ती तिला म्हणाली, "शाबास, अगदीं मुंबई टाईमवरच आलीस कीं. अग, अशानं आतां आपल्याला शाळेकडे नाहीं जातां येणार. थेट स्टेशनावरच धूम ठोकली पाहिजे ! आहेस कुठं ? गाडी म्हटलं बरोबर ५-५५ ची आहे, आहेना ठाउक, बाईसाहेब ?"

विमलनें तिला जरा एकीकडे बोलावून नेलें व म्हटलें, "कमल, तुझी आई बरीच आजारी दिसते कीं ग ! मी म्हणत्यें, आपण जाण्याचा बेत रद्द केला तर ?"

"नाहीं ग, विमल, आई कांहीं तितकीशी आजारी नाहीं कांहीं. गेले २।३ दिवस होती. पण आज तीच म्हणाली मला कीं, मला आतां बरं वाटतंय , तुम्ही जा संमेलनाला म्हणून. अन् विमल, आमच्या शेजारच्या सुधाताई आहेत ना, त्यांनीं आईकडे नीट लक्ष द्यायचं कबूल केलें आहे. मग जायचं ना ?"

विमलला मोठा पेंचच पडला. 'नाहीं' असं स्पष्ट सांगायचें तिच्या अगदीं जिवावर आलें. कारण कमलला संमेलनाविषयीं इतकी कांहीं उत्कंठा लागून राहिली होती कीं तिला आतां कोणीं जाऊं नको म्हणण्याची सोयच उरली नव्हती. इतकेंच काय ? पण नको म्हणून

सांगून देखील तिनें तें ऐकलें असतें कीं नाहीं कोण जाणे? विमलनें पुन्हा तिचें मन वळविण्याचा प्रयत्न केला. पण कमलची समजूत पटण्यांचें कांहीं चिन्ह दिसेना. तिचें आपलें म्हणणें, "आई स्वतः म्हणते आहे जा म्हणून आणि तूं आतां आजीबाईसारख्या शंका कुशंका काढीत नको बसूं. जायचं असेल तर लौकर चल. उशीर होतोय् आपल्याला. नाहीं तर नाहीं जायचं म्हणून सांग कशी? बाकी तूं जा हो आपली. तुला काय म्हणून मी राहायला सांगूं अशी मौज टाकून. तुझी आई थोडीच आजारी आहे? आमचं नशीबच असं अवसानघातकी त्याला कोण काय करणार?" असें म्हणत असतां तिच्या टपोऱ्या डोळ्यांतून दोन भले मोठे अश्रुबिंदु तरळतांना विमलला स्पष्ट दिसले. विमलच्या मनाचा या प्रकारानें बराच गोंधळ उडाला. इतक्यांत राधाकाकूंनीं त्यांना हांका मारल्या. त्याबरोबर त्या दोघी त्यांच्या अंथरुणापाशीं गेल्या.

राधाकाकू काकुळतीनें म्हणाल्या, "मुलींनो, कसला वाद घालीत बसलां आहां उगीचच. जा ना लौकर. तुमची गाडी नाहीं का चुकणार? विमल, खरंच मला अंमळशानं बरं वाटेल, जा तुम्ही."

कमल विमलकडे अधीरपणें पहात होती. शेवटीं विमलनें कांहीं एक निश्चय मनांत केलासें दिसलें व कमलबरोबर ती स्टेशनावर गेली. बरोबर सामान वगैरे विशेष कांहीं नव्हतेंच.

पण गाडी स्टेशनांत येतांच उतारूंच्या व चढणाऱ्यांच्या धांदली-गडबडींत कमलला कांहीं तरी निमित्त सांगून तिनें प्लॅटफॉर्मवरून हळूच काढता पाय घेतला आणि ती तडक त्याच पावलीं कमलच्या घरीं आली. सुदैवानें तिच्याकडे कोणाचेंच लक्ष गेलें नाहीं. जीं ती

आपल्याच गडबडींत नी घाईंत म्हणून बरें झालें. नाहींतर तिला ओळखणारीं माणसें पुष्कळ. मग तिला अशा रीतीनें तेथून निसटतां आलें नसतें.

तिला घरीं एकटीच परत आलेली पाहून राधाकाकूंना जरा आश्चर्यच वाटलें. पण तिचा कनवाळू स्वभाव त्यांच्या आधींपासूनच्या परिचयाचा होता. तेव्हां त्या चाणाक्ष मातेनें विमलच्या एकंदर मघांच्या गडबडीवरून कयास बांधलाच होता कीं, ही कमलला घेऊन घरीं परत येईल. म्हणून त्यांनीं विचारलें, " काय, एकटीच दिसतेस. कमल नाहीं का आली तुझ्या बरोबर ? "

" नाहीं. तिच्या आत्यंतिक उत्सुकतेच्या आड येणं बरं नव्हे म्हणून मी तिला चुकवून इकडे निघून आलें. तिला संमेलनाची भारी हौस होती नी काकू, होऊं दे तिची हौस पूर्ण. तिच्या ठिकाणीं मलाच तुम्ही आपली मुलगी समजा नी मला तुमची शुश्रूषा करूं द्या."

विमलचें सौजन्य, परोपकारशीलता व स्वार्थत्यागाची प्रवृत्ति पाहून बिचाऱ्या म्हातारीचे शुष्क डोळे पाण्यानें भरून आले व तिनें विमलला आपल्या क्षीण हातांनीं आपल्या पोटाशीं ओढलें. तिच्या पाठीवरून प्रेमानें हात फिरवीत ती वृद्ध माता कांहींशी स्वतःशींच उद्गारली, " धन्य धन्य विमलची माता ! "

विमलनें घरांतला केरवारा केला. काकूंचें आंथरूण झटकलें. त्यांना चहा करून दिला. जराशानें एनिमा वगैरे दिला व त्यांच्या संमतीनें ती डॉक्टरांस बोलवावयास गेली. डॉक्टरनीं येऊन त्यांना तपासलें. व थोडासा चिंतातुर चेहरा करून म्हटलें, "हें पहा, यांना आजच्या

दिवस फार जपलं पाहिजे बरं का ? मी देतों तें घ्यायचं औषध व पुड्या आळीपाळीनें सारख्या तासातासानं न चुकतां द्यायच्या आणि मला संध्याकाळीं ५ वाजतां येऊन भेटा दवाखान्यांत. जर एवढ्यानं बरं वाटलं नाहीं तर इंजेक्शन देईन संध्याकाळीं येऊन. बरं. सांगितल्याप्रमाणं करा. काळजी करूं नका. होतील बऱ्या. मात्र आजीबाई, अगदीं हलायचं नाहीं बरं का अंथरुणावरनं. ”

विमलनें विचारल्यावरून डॉक्टरांनीं काकूंना फक्त मोसंब्यांचा रस द्यायचा असें सांगितलें व ते निघून गेले. मोसंबीं घरांत नव्हतीं. विमलनें लगेच जाऊन डॉक्टराकडचें औषध व बाजारांतून मोसंबीं आणलीं आणि डॉक्टरांच्या सूचनेबरहुकुम राधाकाकूंना तासातासानें औषध व पुड्या देण्यास सुरवात केली. ११-११॥ चे सुमारास मोसंब्यांचा रस काढून दिला. काकूंच्या सांगण्यावरून तिनें स्वतःकरतां शेगडीवर थोडा भात टाकला व थोड्या वेळानें जेऊन घेतलें. याच वेळीं मुली मोर वन-भोजनाच्या ऐन दंगलींत मजा मारीत असतील आणि आपण येथें एका मैत्रिणीच्या घरीं आजारी माणसाच्या सांनिध्यांत मेतकूटभात खात आहों असा एक गंमतीचा विचार तिच्या मनांतून झर्कन् येऊन निघून गेला. पण तिला तें भातपिठलें त्यावेळीं खरोखर एकाद्या पक्वान्नाच्या भोजनापेक्षांहि अधिक रुचकर आणि गोड लागलें. तिच्या हृदयांत कर्तव्यनिष्ठेची प्रसन्नता होती. आणि मन सुप्रसन्न असलें कीं कोंड्याचा सुद्धां मांडा नाहीं का होत ?

दुपारचे वेळीं राधाकाकूंचा थोडा डोळा लागला. व तास दीड तास त्यांना निवांत झोंप लागली. त्या जाग्या झाल्या तेव्हां त्यांना बरीच हुषारी वाटूं लागली होती. विमलनें त्यांना पुन्हा पुडी दिली. व

परत ‘ रस देऊं का ’ असें विचारलें. पण राधाकाकूंना कांहीं नको होतें. त्यांनीं विमलला अगदीं आपल्याजवळ बोलावलें व तिच्या गोऱ्या-पान व तेजस्वी तोंडावरून व काळ्याभोर केंसावरून आपला क्षीण पण प्रेमळ हात फिरवीत त्या म्हणाल्या, “ बाळे, तूं कां उगीच माझ्या-साठीं एवढे श्रम घेतेस ? छे. छे. मला भारी वाईट वाटतं, माझ्यामुळें तुला संमेलनाला मुकावं लागलं म्हणून. कमल राहिली असती तर तिची गोष्ट वेगळी. तुला उगीचच त्रास पडला अन् शिवाय श्रीखंडपुरीऐवजीं भात पिठलं नी गाण्याबजावण्याऐवजीं माझं म्हातारीचं कण्हणं कुंथणं वांट्याला आलं. होय ना ? ”

त्यावर विमल म्हणाली, “ काकू, मला तुम्ही कमलच्या जागीं समजायचं सकाळीं कबूल केलं होतं ना ? मग आतां कां बरं असं बोलतां ? काकू, तुमची कमल फार हुषार आहे, प्रेमळ आहे, मैत्रीला खरोखर चांगली आहे. परंतु त्यागाची—संयमाची भावना तिच्यांत अजून आलेली नाहीं. त्यामुळं तुम्हांला अशा स्थितींत टाकून देखील तिला मौज करावीशी वाटली. ‘ स्वसुखनिराभिलाषः खिद्यसे लोकहेतोः ’ या विषयावर तिनं माझ्यापेक्षां उत्कृष्ट निबंध लिहिला होता. व त्यांत तिला पहिलं बक्षिस पण मिळालं होतं. पण प्रत्यक्ष व्यवहारांत तसं वागण्याची पाळी आली कीं पुष्कळशीं चांगलींहि माणसं डगमगतात व त्यांना पोंच राहात नाहीं—त्यांचा तोल जातो व उक्ति वेगळी अन् कृती वेगळी असा प्रकार होतो. काकू, कमल अजून अल्लड आहे. पण तिच्यांतहि चांगले गुण आहेत. तेव्हां तिच्या कमीपणावर मला मैत्रीण या नात्यानं पांघरूण नको का घालायला ? ”

राधाकाकूंना विमलचा हा शहाणपणा पाहून अत्यंत अचंबा वाटला. व अशीं मुलें ज्यांच्या उदरीं येतात तीं आईबापें खरोखर किती धन्य होत, असा विचार त्यांच्या मनांत आल्यावांचून राहिला नाहीं.

पावणेपांच झाले म्हणून विमल लगेच उठली व काकूंची परवानगी घेऊन डॉक्टरांच्या दवाखान्यांत गेली व त्यांना तिनें सांगितलें, " आतां राधाकाकूंना थोडें बरें वाटत आहे. तापहि थोडा उतरला आहे नी थोडासा घामहि येऊं लागला आहे."

ही हकीकत ऐकून डॉक्टरांच्या मुद्रेवर समाधानाचें स्मित झळकलें. " ठीक आहे," ते म्हणाले. " केस थोडी 'सीरीयस' [ चिंताजनक ] होती पण मीं दिलेल्या औषधानं काम भागलं म्हणायचं. नाहींतर मला येऊन इंजेक्शन द्यावं लागलं असतं. बरं, आतां औषध शिल्लक असेल तर तेंच चालू ठेवा. पण आतां, मात्र दोन दोन तासांनीं द्या. अन् मोसंबीं अगर द्राक्षं अशासारख्या फळांवांचून कांहीं खायचं नाहीं असं सांगा." विमलनें डॉक्टरांचे योग्य शब्दांत आभार मानले व ती घराकडे परत येऊन राधाकाकूंच्या उशाशीं बसून राहिली. येतांना तिनें थोडीशी मोसंबीं व द्राक्षें आणलीं होतीं. तिनें काकूंना थोडासा मोसंब्यांचा रस काढून दिला आणि थोडीशीं द्राक्षें खावयास दिलीं. डॉक्टरांच्या सांगण्याप्रमाणें औषध दिलें व पुढें तें कसें घ्यायचें तें काकूंना सांगून ठेवलें. इतकें झाल्यावर तिनें तापाची नळी लावून परत एकदां ताप पाहिला. आतां तो १००-१००॥· पर्यंत उतरला होता. गळ्याशीं व मानेशीं बराच घाम येऊं लागला होता. म्हणून विमलनें स्वच्छ, कोरड्या टुवालनें तो पुसून काढला. राधाकाकूंना अगदीं करमेना म्हणून त्यांच्या सांग-

ण्यावरून त्या नित्यनियमानें वाचीत असलेल्या पांडवप्रतापाचा चालू अध्याय तिनें त्यांस वाचून दाखविला. विमलचा आवाज जात्याच मधुर व उच्चार स्पष्ट आणि अस्खलित; त्यामुळें तिचें वाचन राधाकाकूंच्या आधिऱ्या कानांना भारी गोड वाटलें. ती वाचीत असतांना त्या प्रेमळ व श्रद्धाळू म्हातारीचे डोळे कितीदां तरी ओले झालेले दिसले.

एवढें होत आहे तोंपावेतों घड्याळांत ६॥ होऊन गेले होते. कमल अजून आलेली नव्हती. पण ती इतक्यांतच यावयास झाली होती. अंमळशानें विमलनें घरांत दिवाबत्ती करून राधाकाकू लावीत त्याप्रमाणें देवापुढें समई व निरांजन लावून तिनें राधाकाकूंचा निरोप घेतला. मात्र जातांना तिनें " मी तुमच्या शुश्रूषेकरतां इथं सबंध दिवस-भर होतें असें मात्र कमलला कळवूं नका हो ! " असें अगदीं निर्वा-णीनें त्यांना सांगितलें. आणि राधाकाकूंनीं पण तिचा त्यांतील अंतस्थ हेतु ओळखून तिला ' बरें ' म्हटलें.

विमल गेल्यावर थोड्या वेळानें शेजारच्या सुधाताई घाईघाईनें आंत आल्या व विचारत्या झाल्या, " काय काकू, कसं आहे तुमचं आतां ? खरंच, काकू, मी तुमच्या कमलजवळ सकाळीं म्हणालें होतें खरी कीं तुझ्या आईकडे मी लक्ष ठेवीन अन् कांहीं लागलं बिगलं तर देईन म्हणून. पण काकू, माफ करा हं, मला बाई, तुमच्याकडे यायला उभ्या दिवसांत फुरसतच मिळाली नाहीं. ती मुंज्यांची सोनुताई आहेना तुम्हांला ठाऊक ? ती हो त्या वेताळवाडींत राहते ती. तिच्या मुलीचं होतं आज बारसं. आज सकाळीं तुमची कमल येऊन गेल्यानंतर त्यांच्याकडचं आलं बोलावणं. मग न जाऊन कसं चालेल ? माझ्या

मावशीच्या आतेच्या पुतणीची ती सख्खी सावत्र मुलगी. म्हटलं गेलं नाहीं म्हणजे उगीच ठपका बसायचा. तसं पाहायला गेलं तर कांहीं आमचा त्यांचा फारसा संबंधहि नाहीं नी ऋणानुबंधहि नाहीं. पण म्हणतात ना तशांतली गत. तेव्हां—मी काय बरें सांगत होतें तुम्हांला ? हां—तेव्हां बारशाची सर्व तयारी करायची—कुंची, टोपडं, झबलं, खण हें न् तें—नको का सगळं करायला ? यांची ऑफीसला जाण्याचीहि आजच घाई. रोज १०॥ ला जातात तर आज रविवार असून देखील बरोबर १० ला बोलावलं होतं साहेबानं. तें काय म्हणे स्टाकटेकिन् कीं फाक टेकिन् आहे आज त्यांच्या कंपनीचं. तेव्हां काकू, सांगायचं तात्पर्य काय कीं मला बाई तुमच्याकडे बिलकूल यायला फावलं नाहीं. तशांत एकाद दुसऱ्यांदा उभ्या उभ्या येऊन गेलें असतें. पण तुमच्या कमलची ती शाळासोबतीण होती इथं. तेव्हां म्हटलं, कुठून तरी का होईना, काकूंकडे लक्ष द्यायला माणूस आहे, म्हणून नाहीं आलें झालं. बरं वाटतंय् ना आतां, काकू ? तुम्हांला साबूदाण्यांची खीरबीर कांहीं करून देऊं का ? संकोच नका धरूं. कांहीं लागलं तर सांगा हं ? अहो, शेजारधर्माला माणसानं नको का जागायला ? कुणी कुणाला देऊन कांहीं पुरत नाहीं. पण म्हणतात ना तशांतली गत. आपल्या हातून होईल तितका परोपकार करावा. बरं येतें आतां. अन् कमल नाहीं अजून आली ती ? करकरीत तिन्ही सांजा होऊन गेल्या तरी कसल्या हो ह्यांच्या ट्रिपा चालल्या आहेत ? अन् तुम्हांला अशा आजारी टाकून ती आधीं गेलीच कशी वनभोजनाला ? कांहीं म्हणा तुम्ही काकू, या अलीकडच्या मुलींना मुळीं मायाच कमी—” सुधाताई आणखीहि

पुष्कळ बोलल्या असत्या पण तितक्यांत त्यांची धाकटी मुलगी रडत रडत तिथं आली अन् मग तिला कडेवर उचलून घेऊन तिची समजूत काढीत त्या आपल्या घरांत निघून गेल्या.

राधाकाकू जात्या सहनशील नी गरीब स्वभावाच्या म्हणूनच सुधाताईंच्या टकळीपुढें त्यांच्यानं एवढा वेळ दम धरवला ! दुसरी तिसरी कोणी बाई असती तर तिनें म्हटलें असतें, "अहो, तुम्हांला दिसत नाहीं का मी आजारी आहें तें ? मला या तुमच्या बोलण्याची कटकट नाहीं सोसवत." वगैरे. परंतु राधाकाकूंचा स्वभाव पडला अतिशय सोशीक व पडखाऊ. त्यामुळें त्यांना स्वतःला त्रास झाला तरी त्या दुसऱ्याचें मन सहसा दुखवायच्या नाहींत.

कमल जवळ जवळ आठाचे सुमारास घरीं परत आली. ती अगदीं आनंदांत दिसत होती. दारांत तिच्या मैत्रिणी एकमेकींचा निरोप हंसत खिदळत घेत होत्या; "उद्यां काय ? सुट्टी आहे, तेव्हां जाऊं कुठच्या तरी चांगल्या शोला (सिनेमाला)." "मंदा, येशील ना ग तूं. यू ओ अस् ए शो, मंदा. अन् कुमुद, तूं पण आली पाहिजेस हं." "अग सुमे, त्या नव्या चित्रपटांत जयश्रीचं काम म्हणे बहारीचं झालंय्."

"ठरलें ना मग, उद्यां संध्याकाळीं बरोबर पांचचा शो.

"बरं, बरं, Good-bye, Scholar (नमस्ते, पंडिताबाई)"— अशा प्रकारचीं त्यांचीं आपआपसांत निदान पांच मिनिटें तरी कमलच्या दाराशीं बोलणीं चालली होतीं. मग मुली पांगल्या आणि कमल त्यानंतर घरांत शिरली. संमेलनाच्या आनंदाच्या भरांत—आणि विशेषतः

तिला तिथल्या चढाओढींत व नाट्यसंवादांत मिळालेल्या यशानें ती इतकी गुंग (वाटल्यास धुंद म्हणा) झाली होती की आपली आई घरांत आजारी पडलेली आहे, आणि कदाचित् तिचें जास्तकमी असण्याचा संभव आहे, हें सर्व ती एवढा वेळ विसरूनच गेली होती. आणि आतां देखील बरोबरीच्या मुलींच्या हंसण्याखिदळण्यानें तिच्या 'स्वानंद–साम्राज्यांत' जास्तच भर टाकली होती. ती घरांत जी शिरली ती 'राधिका चतुर बोले। तुझी माझी प्रीत जुळे, कान्हा ॥' हें गाणें गुणगुणतच !

पण तेवढ्यांत राधाकाकूंना खोकल्याची उबळ आली तेव्हां कुठें आमच्या कमलाताईची 'आनंद-समाधि' खाडकन् उतरली व 'राधिका चतुर' ची शीळ बंद पडली. ती आईच्या आंथरुणपाशीं चटकन् गेली. तिच्या आंगाला हात लावून कातर स्वरांत तिनें विचारलें, "आई, कसं वाटतं आहे तुला ?" काकूंचें अंग आतां थोडें फार कोमट लागत होतें. कमल त्यांचें कपाळ हलकें हलकें चेपूं लागली व मधून मधून त्यांच्या आंगावरून प्रेमानें हात फिरवूं लागली. आईनें आपल्या प्रश्नाला कांहींच उत्तर दिलें नाहीं. तेव्हां ती आपल्यावर रागावली तर नाहींना, या विचारानें तिचें मन तिला खाऊं लागलें.

"आई, बोलत कां ग नाहींस ? तुला राग आला होय मी तुला अशी टाकून गेलें म्हणून ? खरंच, आई, आतां किनै मला भारी वाईट वाटतं. नसतें गेलें तरी कांहीं बिघडलं नसतं. पण आई, तूंच ना म्हणालीस कीं, जा बरं, मला अमळशानं बरं वाटेल म्हणून ? म्हणून

मी गेलें. शिवाय मला मास्तरांनीं संवादांत काम दिलं होतं. गेलें नसतें तर त्यांची उगाच बोलणीं खावीं लागलीं असतीं.

"आई, विमल किनै माझ्याबरोबर स्टेशनापावतर आली नी शेवटीं गाडींत चढते वेळीं तिनं जो गुंगारा दिला तो अगदीं अखेरपावतर. हें ग काय तिचं असलं चमत्कारिक वागणं? मधेंच कुठं निघून गेली कोण जाणे. बाकी तिचं काम देखणेबाईनीं आयत्या वेळीं केलं म्हणून बरं झालं, नाहींतर आजचा शाकुंतलांतला प्रवेश कांहीं करतां आला नसता. नी मग केवढा विरस झाला असता सर्वांचा? पण आई, कसा छानदार झाला तो प्रवेश! विमल असती तर याहूनहि तो विशेषच रंगला असता. अन् खास तिला एखादं बक्षीस पण मिळालं असतं. होतंच तसं तिचं काम! पण काय उपयोग? विमलच्या नशीबींच नव्हती आजची मौज—" ती थोडीशी थांबली. आईनं एवढा वेळ एकदांसुद्धां तोंड उघडलं नाहीं कीं आपल्याकडे नुसती नजरहि टाकली नाहीं, ही गोष्ट त्या चलाख मुलीच्या लक्षांत यावयास वेळ लागला नाहीं, म्हणून तिनें बोलणें आवरतें घेतलें. व ती अगदीं मुकाट्यानें हिरमुसलें तोंड करून आईचे पाय चेपूं लागली. बराच वेळ तिनेंहि पण बळेंच मौन धरलें.

मातृहृदयच तें? त्याच्यानं काय फार वेळ स्वस्थ बसवणार आहे? शेवटीं राधाकाकू म्हणाल्या, "पुरे बरं, कमल, आतां पाय चेपणं. तुला कांहीं खायचं असेल तर स्टोव्ह पेटव आणि भात टाक."

आईच्या एवढ्याच बोलण्यानें कमलला उत्तेजन वाटलें. ती म्हणाली, "आई, मला बिलकूल भूक नाहीं. दुपारीं श्रीखंडपुरी झाली नी संध्याकाळीं परत चहा चिवडा. त्यामुळें मला आतां मुळींच भूक नाहीं. तुला थोडा गरम चहा बनवून देऊं का?" आईनें होकार दिला. व कमलनें चहा केला व आईला देऊन थोडासा आपणहि घेतला. आतां राधाकाकूंचा ताप पूर्णपणें उतरला होता. कमलनें त्यांचा घाम नीट पुसला. सुधाताईविषयीं तिनें आईस विचारलें, पण 'हो, त्या आल्या होत्या.' असें मोघम उत्तर देण्यापलीकडे त्यांनीं तिला खऱ्या प्रकारची कांहींच दाद लागूं दिली नाहीं. आईला आपण गेल्यावर दिवसभर बरें वाटत होतें अशीच तिची समजूत या त्यांच्या मोघम बोलण्यानें व तिच्या प्रश्नांना मधून मधून त्यांनीं दिलेल्या नुसत्या हुंकारांनीं झाली. अर्थात् कमलला जो संशय वाटला होता कीं आपणास चुकवून विमल आपल्या घरीं आईची शुश्रूषा करायला आली असेल त्याचें सहजच निराकरण झालें. कारण विमल जर आली असती तर आई आपल्याला तसें स्पष्ट बोलल्यावांचून राहती ना असें तिला वाटलें, आणि म्हणून त्या प्रश्नांवर आईला खोदून खोदून विचारण्याच्या भानगडींत ती पडली नाहीं. त्या रात्रीं राधाकाकूंना झोंप बरी लागली व दुसरे दिवशीं सकाळीं त्यांना बरें वाटूं लागलें. डॉक्टरांचें औषध नियमितपणें घेतल्यामुळें त्यांची प्रकृति चारपांच दिवसांत खडखडीत बरी झाली.

आज वन-संमेलनानंतरचा दुसरा रविवार. आज सरस्वतीभवन हायस्कूलचा बक्षीस समारंभ होता. नगराध्यक्षांनीं सभेचें अध्यक्षस्थान मंडित केलें होतें. शाळेचा भव्य हॉल (सभा-गृह) स्त्रीपुरुषांनीं व

मुलांमुलींनी गच्च भरून गेला होता. हॉल बाहेरील पटांगणांतहि बराच जमाव जमलेला दिसत होता. ध्वनिक्षेपक यंत्रामुळें सर्वांना दूरपर्यंत ऐकूं येण्याची उत्कृष्ट सोय केली होती. प्रार्थनागीत, स्वागतपद्य, आर्केस्ट्रा (संघवादन) वगैरे ठराविक कार्यक्रम झाल्यानंतर प्रमुख अध्यापकांचें स्वागतपर भाषण झालें व त्यांनीं अध्यक्षांस विद्यार्थिनींना बक्षिसें वांटण्याची विनंति केली. हीं बक्षिसें निरनिराळ्या नियतकालिक परीक्षा, वेळोवेळीं झालेल्या वक्तृत्वाच्या व निबंधलेखनाच्या वगैरे चढाओढी, व्यायाम व मैदानी खेळांच्या स्पर्धा, अशा विविध शालेय विषयांत उत्तम यश मिळविण्या-बद्दलचीं होतीं. नांवें वाचलीं जातांच त्या त्या मुली व्यासपीठावर येत व अध्यक्षांच्या हातून आपआपलें बक्षीस घेऊन त्यांना अदबीनें नमस्कार करून श्रोतृवर्गाच्या टाळ्या घेत आपल्या जागीं जात. कमल व विमल या दोघींनांहि त्यांच्या इयत्तेंतील व इतरहि बरींच बक्षिसें मिळालीं आणि तीं त्यांनीं टाळ्यांच्या कडकडाटांत घेतलीं.

बक्षिसांचा पहिला गट संपला. आतां दुसरा गट म्हणजे वनसंमेलनांतील बक्षिसें यांचा होता. या बक्षिसांविषयीं मुलींत खूपच कुतूहल निर्माण झालें होतें, कारण बक्षिसांचा निर्णय अजूनपर्यंत मुद्दामच जाहीर करण्यांत आलेला नसून समारंभात एकदमच त्या त्या विद्यार्थिनींना बक्षिसें अध्यक्षांच्या हस्तें देण्यांत यावयाचीं होतीं. यामुळें साहजिकच श्रोतृसमुदायापैकीं विद्यार्थिनींचा विभाग आतां कोणाकोणांस बक्षिसें मिळतात तें पाहाण्यास अगदीं कान टवकारून बसला होता.

विमलजवळ बसलेली सीता साळुंके तिचीं वाचायचीं पुस्तकें हातांत घेऊन सहज चाळीत चाळीत तिला म्हणाली, " विमल, किती

छान आहेत ग तुझीं हीं पुस्तकें. पण गडे, आणखीही एक दोन पुस्तकें तुला मिळायचीं, तीं मात्र व्यर्थ घालविलींस!" विमलला प्रथम तिच्या बोलण्यांतली खोंच कळेना, म्हणून तिनें प्रश्नार्थक चेहरा केला. "अग, एवढं कसं तुझ्या ध्यानांत येत नाहीं? अग, मी संमेलनाबद्दल म्हणत होतें. तूं संमेलनाला आली नाहींस त्यामुळें नाहीं का तुझीं बक्षिसें बुडालीं?" विमलनें मंदस्मित केलें. "खरंच. बागळे, तूं कां ग नाहीं आलीस संमेलनाला?" विमल कांहीतरी उत्तर देऊन वेळ मारून नेणार होती, इतक्यांत प्रमुख उठले व बोलूं लागले. त्यामुळें सभागृहांतील गोंगाट एकदम बंद पडून सर्वत्र स्तब्धता झाली.

मुख्याध्यापकांनीं यंदाचें संमेलन नेहमींपेक्षां कसें वेगळ्या पद्धतीनें साजरें करण्यांत आलें, तें किती मजेशीर व यशस्वी झाले तें थोडक्यांत सांगितलें आणि नंतर एकेक नांव वाचतांच अध्यक्षमहाराजांनी एकेका मुलीला तिचीं नियोजित अशीं छान छान बक्षिसें वांटलीं व प्रत्येकीशीं मोठ्या प्रेमानें हस्तांदोलन केलें. अर्थात् या मुलींत फिरून कमलची हजेरी लागली हें सांगावयास नकोच. तिला यावेळीं एक सुंदर मेंडोलिन व एक छानदार टेनिस बॅट् मिळाली. तीं बक्षिसें घेत असता टाळ्यांचा नुसता कडकडाट होत होता. तिचा चेहरा या वेळीं फार खुलला. त्यांतल्या त्यांत प्रमुखांनीं अध्यक्षांशीं तिची विशेष ओळख करून दिली. त्यामुळें तर तिला मूठभर अधिक मांस चढल्याचा भास झाला. अन् ती जवळ जवळ उड्या मारीतच आपल्या जागेवर जाऊन बसली.

यानंतर प्रमुख पुन्हां उठले व म्हणाले, "अध्यक्षमहाराज, माझे सहकारी व विद्यार्थिनींनो, आतां एक शेवटचें जादा बक्षीस द्यावयाचें

राहिलें आहे. या बक्षिसासंबंधीं तूर्त एवढेंच मी सांगूं शकतों कीं हें बक्षीस देण्याची कल्पना ही मूळ शाला-चालकांची नसून ती एका सामान्य पालिकेकडून आम्हांस मिळाली. याबद्दल त्यांचे मी आभार मानतों. त्यांच्या नांवाचा उल्लेख करण्याची तूर्त मला परवानगी नाहीं. तरीही मुलींना तें यथाकाल समजेल.

"असलीं बक्षिसें तुम्हीं मुली जितकीं अधिक मिळवाल तितकें तुम्हीं सर्वजणी येथें घेत असलेल्या शिक्षणाचें सार्थक झालें, असें आम्ही मानूं. असो. तुम्हांला ऐकूंन आश्चर्य वाटेल, पण हें जादा बक्षीस आपल्य गेल्या रविवारच्या संमेलनापैकींच असलें तरी तें संमेलनाला न येणाऱ्या एका विद्यार्थिनीनें मिळविलें आहे. व तें माझे मतें एकंदर संमेलना-तल्या बक्षिसांत उत्तम बक्षीस होय." येथें मुख्याध्यापक थोडे थांबले. थोडें खालीं वांकून त्यांनीं अध्यक्षांना हलक्या आवाजांत थोडक्यांत कायसें सांगितलें. इकडे मुली टाळ्या वाजवायला जणूं विसरूनच गेल्या. त्यांचीं तोंडें आश्चर्यानें 'आ' झालीं. हें काय गौडबंगाल आहे तें त्यांना मुळींच समजेना. त्यांचें कुतूहल बरेंच ताणलें गेलें. त्यांची आपआपसांत खूपच कुजबूज सुरू झाली. प्रमुख पुन्हां बोलूं लागले त्याबरोबर एक-दम सर्वत्र पुन्हां सामसूम झालें. ते म्हणाले, "तुम्हां विद्यार्थिनींना आश्चर्य वाटणें साहजिक आहे. परंतु या विषयींचा अधिक खुलासा या प्रसंगीं न करतां एक दोन दिवसांत तुमच्या नोटीस बोर्डावर (प्रसिद्धि-फलकावर) लावलेला तुम्हांला दिसेलच. तूर्त एवढें सांगितलें म्हणजे पुरे कीं, हें जादा बक्षीस विमल परमानंद वागळे हिला देण्यांत आलें आहे."इतकें बोलून त्यांनीं अध्यक्षांच्या हातीं विमलला देण्याकरतां एक मोठें पुस्तक दिलें. अध्यक्ष तें हातीं घेऊन त्या विद्यार्थिनीची वाट पहात उभे राहिले. पण विमल झटकन्



विमल वागळे बक्षीस घेत आहे.

पुढें होईना. तिलाहि इतरांप्रमाणेंच त्या बक्षिसाचें कोडें पडलें व अंशतः विचारमग्नतेनें व अंशतः लाजेमुळें तिचें पाऊल जागचें हलेचना. परत जेव्हां प्रमुखांनीं तिला प्रेमळपणानें पुढें येण्याबद्दल पुन्हा इशारा दिला तेव्हांच कुठें ती भानावर येऊन पुढें झाली व व्यासपीठावर चढून कांपऱ्या हातानें तिनें अध्यक्षांनीं तिजपुढें हंसत मुखानें धरलेलें पुस्तक घेतलें व लाजेनें खालीं मान घालून ती परत आपल्या जागीं येऊन बसली. श्रोतृवर्गानें जोरानें टाळ्या वाजवून तिचा आदर केला.

इतक्या वेळांत अर्थात् मुलींत खूपच कुजबूज चालू होती व फारच थोड्या मुली या टाळ्यांत सामील झाल्या होत्या. मात्र आतां विमल सर्व सभेच्या अवधानाचें केंद्र बनली होती. आतांपर्यंत कोणाही मुलीचा झाला नव्हता एवढा गौरव तिचा झाला होता. कमलचा चेहरा या वेळीं बारकाईनें पाहाणारास बराच निस्तेज दिसला असता. परंतु कमल जात्या मत्सरी नव्हती. थोड्या वेळानें का होईना ती विमलपाशीं हळूच गेली व तिचें तिनें हंसून अभिनंदन केलें! अर्थात् त्यावेळीं अधिक बोलणें शक्य नव्हतें.

अध्यक्षमहाराजांचें रीतसर भाषण झालें व त्यांत त्यांनीं शालेय शिक्षणाचीं ध्येयें काय असावीं यावर सुंदर विवेचन केलें. शेवटीं निष्कर्ष म्हणून असें सांगितलें कीं, "शिक्षणाचा मूळ व मुख्य उद्देश संस्कृति हा असून संस्कृति याचा अगदीं साधा सरळ अर्थ म्हणजे माणुसकी होय. व याचें उत्तम प्रात्यक्षिक आज आपल्या विमलाताईनीं तुम्हां आम्हांला आपल्या कृतीनें दाखवून दिलें आहे." शेवटीं सर्व विद्यार्थिनींनीं आपल्यांत अशी उच्च संस्कृति बाणण्याचा मनापासून यत्न करावा असा कळकळीचा उपदेश करून अध्यक्षांनीं आपलें भाषण संपविलें.

सभा थोड्या वेळानें संपली व प्रेक्षकांची पांगापांग झाली. विमल-सभोंवतीं मुलींचा हा घोळका जमला ! कांहीं पालक व पालिकाही त्यांत समील झाल्या. हेतु हा कीं सदरहू बक्षीस तिला कोणत्या कारणा-करतां मिळालें तें तिच्याकडून समजतें का तें पहावें.

परंतु बिचाऱ्या विमललाच जर कसलीच कल्पना नव्हती तर ती तरी या लोकांच्या कुतूहलाचें समाधान कशी करूं शकणार ? तिला तर लाजेनें ' दे माय धरणी ठाय ' होऊन गेलें. आणि तिनें त्या घोळ-क्यांतून कशीबशी आपली सुटका करून घेतली व घराकडे धूम ठोकली ! बिचारीचे आईवडील आज या समारंभास हजर राहूं शकले नाहींत. नाहींतर त्यांना आपल्या मुलीचा हा अकल्पित गौरव पाहून तिला ' कोठें ठेवूं अन् कोठें न ठेवूं ' असें होऊन गेलें असतें. असो. कमलच्या आई राधाकाकू मात्र या सभारंभास उपस्थित होत्या पण त्या जरा उशीरां येऊन एका बाजूला दूर स्त्रियांत बसल्या होत्या. आणि सभा आटोपतांच कमलच्या किंवा विमलच्या दृष्टीस पडण्यापूर्वीच त्या घरींही निघून गेल्या होत्या.

बक्षीस–समारंभानंतर दोनच दिवसांनीं विद्यार्थिनींच्या नोटीस बोर्डावर प्रमुखांनीं स्वतः लिहिलेलें एक छोटेंसें पत्रक (Circular) लागलें. त्यांत कु. विमल वागळेस तें जादा बक्षीस कां देण्यांत आलें त्याचा थोडक्यांत पण परिणामकारक असा खुलासा त्यांनीं केला होता. आणि अशा प्रकारचें संस्कृति-पारितोषिक दरवर्षी अध्यापक समितीच्या मतें जी विद्यार्थिनी त्यास अधिक पात्र ठरेल तिला देण्यांत येईल, अशी त्यांत घोषणा केली होती.

शाळेच्या प्रमुखांना विमलच्या त्या दिवशींच्या त्या अपूर्व त्यागाची हकीकत प्रत्यक्ष कमलच्या आईकडून म्हणजे श्रीमती राधाबाई काळे यांजकडून पत्रद्वारां बक्षीससमारंभापूर्वीच तींनचार दिवस आधीं कळली होती. व पत्रांत त्यांनीं अशी इच्छा प्रकट केली होती कीं कु. विमल वागळे

हिला कांहीं तरी योग्य पारितोषिक प्रकटपणें देण्यांत यावें, त्याचा खर्च आपण स्वत: देऊं. त्यावर उत्तरादाखल मुख्याध्यापकांनीं त्यांचे फार आभार मानले होते. व 'आपली सूचना अत्यंत विचारार्ह असून कु. विमल हिला आपण शाळेच्या खर्चांतून बक्षीस देऊं, आपण त्याबाबत खर्च करण्याची बिलकूल जरूरी नाहीं.' असें राधाकाकूंना लिहिलें होतें आणि शेवटीं त्या एक आदर्श पालक असल्याबद्दलचा आपला अभिप्राय कळकळीनें त्यांस कळविला होता. या उत्तरानें राधाकाकूंचा शाळाधिकाऱ्यांबद्दलचा आदर द्विगुणित झाला हें साहजिकच होतें.

वरील प्रकरणामुळें कमल व विमल यांच्यांत आतां तरी कायमचें वितुष्ट येईल अशी त्यांच्या मैत्रीचा मत्सर करणाऱ्या त्यांच्या निंदकांपैकीं बहुतेकांची कल्पना नव्हे बालंबाल खात्री होती. पण वाचकहो, तुम्हांस कळवायला मला आनंद वाटतो कीं त्यांच्यांत वितुष्ट तर बिलकूल आलें नाहींच पण या सर्व प्रकारामुळें कमलच्या स्वभावांत मात्र विलक्षण स्थित्यंतर घडून आलें व आज जरी या गोष्टीला बरींच वर्षें लोटलीं आहेत तरी सौ. कमलाबाई गोरे (पूर्वाश्रमींच्या काळे) आपल्या आजच्या मोठेपणाचें व लोकप्रियतेचें मूळ बीज कशांत आहे तें विसरलेल्या नाहींत. त्यांची विमलाताईशीं मैत्री आजतागायत अबाधितच आहे. प्रिय वाचक, तुम्हांला विमलाताई वागळेंची पुढची हकीकत ऐकण्याची उत्सुकता असेल नाहीं? बरें, बरें. आणखी केव्हांतरी ती तुम्हांला सांगेन एवढेंच आश्वासन देऊन ठेवून तूर्त तुमची रजा घेतों.



प्रकाशक:— श्रीकृष्ण दामोदर कुलकर्णी, केमकर आणि मंडळी, बुकसेलर्स, पब्लिशर्स व स्टेशनर्स. विठ्ठलभाई पटेल रोड, गिरगांव मुंबई.

मुद्रक:— एम्. आर्. कालवार, प्रफुल्ल प्रिंटिंग प्रेस, नानाशंकरशेटवाडी, ३८०, गिरगांव रोड, मुंबई नं. २.